 Regd. No. M H 1332

# नवभारत

या अंकात –

कामप्रेरणा, मानसोपचार आणि मानसिक आरोग्य
अनु० : प्रा. किशोर मोरेश्वर फडके
श्रीचक्रधरनिरूपित (?) ‘ संपूर्ण ’ श्रीकृष्णचरित्र : ५ :
डॉ. सुरेश म. डोळके
स्त्रीराज्य : ६ :
श्री. शरद पाटील
द्राविड भाषा परिवार ( उत्तरार्ध )
डॉ. सु. बा. कुलकर्णी
महिकावतीची बखर :
राजकीय वंशावळीची उकल
प्रा. भास्कर गिरधारी
बिलेश्वर मंदिराचा शिलालेख
ग्रंथ-परिचय

वर्ष २८
अंक बारावा
सप्टेंबर १९७५
रु. १-२५

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष अठ्ठाविसावे
अंक बारावा

# नवभारत

सप्टेंबर १९७५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. वेडेकर— प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक


| | | |
|---|---|---|
| कामप्रेरणा, मानसोपचार आणि मानसिक आरोग्य | अनु० : प्रा. किशोर मोरेश्वर फडके | १–१७ |
| श्रीचक्रधरनिरूपित (?) 'संपूर्ण' – श्रीकृष्णचरित्र (५) | डॉ. सुरेश म. डोळके | १८–२९ |
| स्त्रीराज्य : ६ : (पूर्वार्ध) | श्री. शरद पाटील | ३०–५६ |
| द्राविड भाषा परिवार (उत्तरार्ध) | डॉ सु बा. कुलकर्णी | ५७–६९ |
| महिकावती बखरीचा उकल | प्रा. भास्कर गिरधारी | ७०–७३ |
| विलेश्वर मंदिराचा शिलालेख | | ७४–७५ |
| ग्रंथ-परिचय | | ७६–८० |


वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. वेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :—

१. संपादकीय :— कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२. व्यवस्थापकीय :— व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## 'नवभारत' ज्ञानेश्वर विशेषांक

–'नवभारता'च्या 'ज्ञानेश्वर विशेषांका'ची किंमत पाच रुपये राहील. मात्र वर्गणीदारांना त्याची वेगळी किंमत द्यावी लागणार नाही. हा अंक संग्राह्य होणार असल्याने जिज्ञासू वाचक, सार्वजनिक व खाजगी ग्रंथालये, महाविद्यालये, उच्च व माध्यमिक विद्यालये यांनी वर्गणीदार होणे त्यांना सोयीचे आहे. अंकाच्या प्रती मर्यादित असल्याने आपली मागणी शक्य तितक्या लौकर पाठवावी.

–हा अंक संग्राह्य स्वरूपाचा होणार असल्याने जाहिरातदारांनी आपली जाहिरात त्वरित पाठवावी.

पत्ता :– व्यवस्थापक 'नवभारत' मासिक प्राज्ञप्रेस.
वाई ( जि. सातारा )

---

## साभार पोच

प्रकाशक : मनोहर पिंपळापुरे, अमेय प्रकाशन, रुईकर, मार्ग, नागपूर ४४०००२.

१. सुखदुःख / ले. माधव मनोहर / किं. ४० रु.

२. अगोचर / चिं. त्र्यं. खानोलकर / किं. १४ रु.

३. अधोलोक / वसंत आबाजी डहाके / किं. १२ रु.

४. मुखवटे आणि चेहरे / श्रीनिवास भणगे / किं. ८ रु.

५. मॅडम / सुभाष अवचट / किं. १५ रु.

◆ ◆ ◆ ◆

प्रकाशक:– कालचक्र प्रकाशन, टिळक पथ, औरंगाबाद, ४३१००१

१. आदिम / फ. मुं. शिंदे / किं. ९ रु.

२. दलित मुक्तिलढा आणि दलित साहित्य / वामन इंगळे / किं. ७ रु.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## श्री. मधुकरराव साठे यांचे दुःखद निधन

'प्राज्ञपाठशाळा मंडळा'चे माजी चिटणीस व 'नवभारत' मासिकाचे प्रारंभापासूनचे मुद्रण – व्यवस्थापक श्री. मधुकर शंकर साठे यांचे दि. २८ ऑगस्ट रोजी निधन झाले, हे कळविण्यास अत्यंत दुःख होत आहे. प्राज्ञपाठशाळेच्या अनेक योजनांच्या उभारणीत व कार्यवाहीत त्यांचा मोठा वाटा होता. वाईमध्ये १९६२ मध्ये स्थापन झालेल्या मानव्य व वाणिज्य महाविद्यालयाचे प्रारंभापासूनचे ते चिटणीस होते. भारतीय स्वातंत्र्यचळवळीतही त्यांनी भाग घेतला होता. त्यांच्यामागे पत्नी, पुत्र, सून व नातवंडे असा परिवार आहे. परमेश्वर मृतात्म्यास सद्गती देवो !

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनु० : प्रा. किशोर मोरेश्वर फडके

# कामप्रेरणा, मानसोपचार आणि मानसिक आरोग्य

[ सुप्रसिद्ध अमेरिकन मानसोपचारतज्ज्ञ डॉ. अल्बर्ट एलिस यांच्या Sex, Psychotherapy and Sanity या लेखाचा स्वैर अनुवाद ]

प्रस्तुत निबंधात मी दोन मुख्य मुद्दे मांडणार आहे. पहिला मुद्दा असा की लैंगिक वर्तनाचे जे प्रकार परंपरेने चुकीचे किंवा अनैतिक म्हणून समजले जातात त्यांच्याकडे विवेकनिष्ठ अथवा निरोगी दृष्टिकोणातून पाहिले असता ते खऱ्या अर्थाने अनिष्ट ठरत नाहीत. आणि दुसरा मुद्दा असा की जरी तुम्ही चुकीचे अथवा गैर लैंगिक कृत्य केलेत तरी त्यामुळे तुम्ही स्वतः कोणी 'भयंकर' अथवा 'दुष्ट' व्यक्ति ठरत नाही; आणि म्हणून तुम्ही स्वतःची कडकपणे निंदा करण्याचे, अथवा लैंगिक प्रमादाबद्दल स्वतःला दोषी किंवा अपराधी समजण्याचेही कारण नाही.

मी बऱ्याच वर्षापूर्वी असे ठरविले की कशाबद्दल म्हणून, अगदी माझ्या स्वतःच्या मूर्खपणाबद्दलसुद्धा अपराधी वाटून घ्यावयाचे नाही; आणि अजून-पर्यंत तरी माझी ही निश्चित भूमिका मी हेकटपणे शाबूत ठेवली आहे. आणि याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट अशी की गेल्या दहाएक वर्षात माझ्याकडे मानसोप-चारासाठी आलेल्या शेकडो रुग्णांना व माझ्या पुस्तकांच्या व निबंधांच्या हजारो वाचकांना त्यांच्या चुकांबद्दल व उणिवाबद्दल चिंता अथवा अपराधी भाव वाटून न घेण्यास मी प्रवृत्त केले आहे. माझ्या बंडखोरीत सुसंगती असल्याचा माझा दावा असल्यामुळे मी फिरून एकदा तीच गोष्ट करण्यासाठी झटणार आहे. मला तुम्हाला पटवून द्यावयाचे आहे की लैंगिक काय किंवा इतर बाबतीत काय, तुम्ही कितीही प्रमादशील अथवा वर्तन केले असलेत तरीसुद्धा तुम्हीसुद्धा 'नालायक' किंवा 'क्षुद्र' नाही; आणि तुम्ही स्वतःला अपराधी समजण्याचे, अथवा स्वतःची निंदा करण्याचे सुतराम कारण नाही.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लैंगिक बाबतीतील नीति-अनीतीच्या आणखी काही तपशीलात शिरण्यापूर्वी माणसाच्या सर्वसामान्य नीतिनियमांबद्दल चार प्रसंगोचित शब्द सांगतो. नीती म्हणजे काय ? नीतीची प्राथमिक तत्त्वे कोणती ? या प्रश्नांविषयी माझी काहीशी पाखंडी भूमिका अशी आहे की नीतीचे पहिले तत्त्व असे : स्वतःशी प्रामाणिक राहा किंवा मुख्यतः स्वतःशी सहृदयतेने वागा. अर्थात मला हे निक्षून सांगितले पाहिजे की या तत्त्वाशी अगदी निकटपणे सल्लग्न असलेले नीतीचे दुसरे एक तत्त्व आहे. ते तत्त्व असे की ज्या कृत्यामुळे अकारण, निश्चित व जाणूनबुजून इतरांचे नुकसान होईल असे कोणतेही कृत्य करू नका. अथवा कांट नावाच्या तत्त्ववेत्त्याने त्याच्या सुप्रसिद्ध नीति-तत्त्वात सांगितले आहे त्यानुसार असे म्हणता येईल की जे कृत्य सार्वत्रिकपणे केलेले तुम्हाला आवडणार नाही ते कृत्य तुम्ही स्वतः करू नका. मात्र मला खंबीरपणे असे प्रतिपादले पाहिजे की नीतीचा हा दुसरा नियम म्हणजे नीतीच्या पहिल्या नियमाचा केवळ उपसिद्धांत आहे; नव्हे तो नियम म्हणजे नीतीच्या पहिल्या नियमातून काढलेले अनुमान ( निगमन ) आहे. पण तरीसुद्धा पहिला नियम म्हणजे : "स्वतःशी प्रामाणिक राहा."

हे असे का ? तुम्ही इतरांशी सदैव सलोख्याने, सहृदयतेने वागावे, आणि त्यांचे नुकसान होईल अशा प्रकारे न वागण्याचा तुम्ही पराकाष्ठेचा प्रयत्न करावा, हे कशासाठी ? कारण असे केल्याने इतरेजन तुमच्याशी माफक ( म्हणजे जितक्यास तितक्या ) प्रमाणात तरी सलोख्याने वागतील आणि क्वचितच तुम्हाला फसवितील अशी निश्चिती होईल, याखेरीज मलातरी दुसरे कारण दिसू शकत नाही. अर्थात काही व्यक्ती तुम्हाला केवळ आवडतात, तुमचे त्यांच्यावर प्रेम आहे, आणि त्यांना संतुष्ट केल्याने तुम्हाला खरोखरच समाधान मिळते म्हणून तुम्ही कधी कधी त्यांच्याशी गोड वागालही- अगदी स्वतःचे नुकसान करून घेऊनसुद्धा त्यांच्याशी गोड वागाल. परंतु हे केव्हा केव्हा सत्य असले तरी काही ते नीतीचे सर्वसामान्य तत्त्व म्हणून प्रतिपादता येणार नाही. शिवाय असे की काही व्यक्ती तुम्हाला केवळ आवडतात किंवा त्यांच्या सहवासात तुम्हाला आनंद वाटतो व म्हणून तुम्ही त्यांच्याशी प्रेमाने वागता याच्याशीमुळी नीति-नियमांचा फारसा संबंधच पोचत नाही. हा केवळ तुमच्या वैयक्तिक मर्जीचा आणि पूर्वग्रहांचा प्रश्न आहे. तुम्हाला एखादे लहान मूल वा प्रौढ व्यक्ती आवडते व म्हणून त्या मुलाला वा त्या व्यक्तीला तुम्ही चांगल्याप्रकारे वागविता म्हणजे तुम्ही एक प्रेमळ गृहस्थ आहात; पण त्यावरून तुम्ही कोणी नीतिमान गृहस्थ अथवा अनीतिमान गृहस्थ आहात असे सिद्ध होत नाही.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मुख्य मुद्दा असा की नीतीचा प्रश्न सामाजिक वर्तनाच्या तत्त्वांबाबत किंवा प्रमाणांबाबत उद्भवतो, वैयक्तिक आवडी-निवडींबाबत उद्भवत नाही. नैतिक आचरण म्हणजे सामान्यतः आपण इतरांशी चांगले वागावे, निदान अकारण त्यांचे नुकसान होईल अशा प्रकारे वागू नये- मग ती इतर माणसे व्यक्तिशः आपल्याला आवडोत अथवा न आवडोत. आणि याचे मुख्य कारण असे की इतरांनी आपल्याशी चांगले वागावे अशी आपली इच्छा असते; आणि आपली अशीही इच्छा असते की स्वतःच्या योग्य वर्तणुकीने असे जग निर्माण करण्यास हातभार लावावा की ज्या जगात राहणे सुरक्षित व हितकारक ठरेल; आणि जर इतरांना आपण वाईट रीतीने वागविले तर त्यांच्याकडून, त्यांच्या मित्रांकडून, नातलगांकडून अथवा पोलिस व न्यायालये ( की ज्या संस्था इतरांवर व आपल्यावर उघड व निर्लज्जपणे लादलेल्या अन्यायापासून संरक्षण देण्यासाठी समाजाने निर्माण केलेल्या असतात ) यांच्याकडून आपल्याला जशास तशी परतफेड होईल ! म्हणजे अंतिम विचारांती नीतिनियम जेव्हा सयुक्तिक असतात तेव्हा ते एका बहुमोल तत्त्वावर आधारलेले असतात ते तत्त्व म्हणजे आपल्याला इतरांनी जसे वागवावे अशी आपली अपेक्षा असते तसे आपण इतरांशी वागण्याचा प्रयत्न करावा. परिणामी नीती स्वार्थत्यागापासून किंवा केवळ परहितनिष्ठेपासून फार दूर असते. तिची उत्पत्ती अत्यंत विवेकी व निखालसपणे स्वहितनिष्ठ प्रेरणांतूनच होते.

तुम्ही कदाचित विचाराल की नीतीचे दुसरे तत्त्व प्रथमक्रमाने मांडणे जास्त सयुक्तिक होणार नाही काय ? वेगळ्या शब्दात म्हणजे, जर आपण प्रथम इतरांशी चांगले वागून आणि प्रेमाने त्यांच्यासाठी स्वार्थत्याग करून एक प्रकारे अशी तरतूद केली की इतर लोकही उलटपक्षी आपल्याशी कृतज्ञतेने व भलेपणाने वागतील, तर आपल्याला जास्त प्रेमळ व छानदार समाज लाभणार नाही काय ? नाही. जोपर्यंत आपण देवदूतांच्या समाजात राहत नाही- आणि आपल्यापैकी फारच थोडे प्रत्यक्षात अशा समाजात राहत असल्याचे दिसते- तोपर्यंत नाही. कारण देवदूत हेच प्राणी असे असतील की प्रथम त्यांच्यावर प्रेम केले व त्यांच्याकरता त्याग केला तर ते अटळपणे प्रेमाची प्रेमाने व सहृदयतेची सहृदयतेने परतफेड करतील. आणि अशा देवदूतांच्या समाजात सदाचरणाला सदाचारी वर्तणुकीने प्रतिसाद मिळेल; व अशा स्वर्गभूमीवर सर्व काही प्रेममय होऊन जाईल !

दुर्दैवानें आजच्या समाजात देवदूत हे अपवादानेच आढळतात. परिणामी इतरेजनांसाठी प्रथम स्वार्थत्यागी व्हावे आणि सदाचाराची फळे त्यांच्याकडून


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नंतर घ्यावीत असे तुम्ही ठरवलेतच तर प्रत्यक्ष होईल असे की इतरेजनांपैकी काहीजण तुमच्या हितासाठी नक्की स्वार्थत्याग करतील व तुमच्यावर प्रेम करतील पण बहुदा बहुसंख्य लोक तसे करणार नाहीत. खरोखर ज्यांच्यासाठी तुम्ही दयाळूपणे वागाल व ज्यांच्याकरता सत्प्रवृत्तीचा मार्ग अनुसरण्यासाठी तुम्ही शिकस्त कराल त्यांच्यापैकी बहुसंख्य लोक तुमच्याशी हिडीस रीतीने वागतील. तुमच्या पाठीत खंजीर खुपसतील, आणि तुमच्या दयाळूपणाचा अनेक दुष्टरीतीने फायदा घेतील. कारण तुम्हाला आवडो वा न आवडो, आपल्या समाजातील अक्षरशः लक्षावधी लोक मूर्ख, अज्ञानी, किंवा भावनात्मक-दृष्टया अस्थिर आहेत आणि म्हणून ते लोक दुसऱ्यांशी मोहकपणे व सदाचाराने वागतील असा भरवसा ठेवण्याच्या योग्यतेचे नसतात. उलटपक्षी तसे लोक नेमक्या विरुद्ध प्रकारे किंवा अगदी पूर्णतः अनैतिकपणे वागतील याचीच खात्री देता येईल.

जेव्हा स्वार्थत्याग हे नीतीचे पहिले तत्त्व केले जाते तेव्हा असे गृहीत धरलेले असते की ज्यांच्याकरता तुम्ही तुमच्या स्वतःच्या हिताचा त्याग करता ते लोक अगदी अविरतपणे योग्य प्रसंगी तुमच्या हितासाठी त्यांच्या स्वहिताचा त्याग करतील. पण हे गृहीत-तत्त्व मूर्खपणाचे आहे. कारण ते सिद्ध करण्यास प्रत्यक्ष पुरावा नाही. वस्तुतः तुम्ही स्वार्थत्यागी भूमिका घेतलीत की त्यामुळे इतरांना तुमचा अवास्तव फायदा घेण्यास व तुमच्याकडे बावळट म्हणून पाहण्यास उत्तेजन मिळते. त्यामुळे माणसामाणसांतील देवाण-घेवाणीच्या नीतीऐवजी परावलंबन, भावनिक अस्वास्थ्य व निर्दय वर्तणूक यांची वाढ होते. शेवट, बहुदा स्वार्थत्याग करणाऱ्या माणसाला उमगते की तो आत्मनाशी, अव्यवहारी आहे; आणि तो स्वतःच्या दुबळेपणाचा तिरस्कार करू लागतो. आणि अखेर परिणाम असा होतो की ज्यांची तो अमर्याद खुशामत करीत असतो त्यांचाही तो द्वेष करू लागतो. या सर्वांचा अंतिम परिणाम म्हणजे वैयक्तिक व सामाजिक सत्यानाश.

तर मग नैतिक मनःस्वास्थ्य आणि समंजस नीती यांचे मुख्य तत्त्व अद्यापि असे की स्वतःशी प्रामाणिक राहा. कारण उघड आहे. हा एकच मार्ग असा आहे की जो अनुसरला तर अशी ग्वाही देता येईल की या अफाट जगात निदान एक व्यक्ती तरी तुमच्या स्वतःच्या हिताची काळजी वाहील. आणि शिवाय "ज्या कृत्यामुळे इतरांना विनाकारण, निश्चित, समजूनउमजून नुकसान पोचेल असे कोणतेही कृत्य करू नका" या पहिल्या नीतितत्त्वाच्या घनिष्ठ उपसिद्धांताचा अवलंब केल्याने आणखीही एक फायदा होईल. तो असा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

की सध्याच्या स्पर्धाळू जगात अकारण इतरांना दुखविल्याने आपल्या वाटयाला जे प्रतिहल्ले येतात त्यांचे प्रमाण बहुधा अत्यल्प राहील. आणि अशा प्रकारे ज्या जगात सापेक्षत: कमी अन्याय ( पण अर्थात अन्यायाचा पूर्णत: अभाव नाही ) आहे असे जग निर्माण करण्यास तुम्ही हातभार लावाल.

आता आपण असे समजू की नीतीचे दोन मूलभूत नियम तुम्ही ग्राह्य मानलेत तर मग ते नियम तुमच्या कामजीवनाला कसे लागू कराल ? हस्तमैथुन, विवाहपूर्व लैंगिक संबंध, व्यभिचार व लैंगिक विकृती यासंबंधी तुमचे नेमके नीति-नियम कोणते राहतील ? पाहू कोणते राहतील ते.

प्रथम हस्तमैथुनासंबंधीचा संभाव्य प्रश्न घेऊ या. योग्य व्याख्या केली तर असे म्हणावे लागेल की ज्याची परिणती सामान्यत: कामेच्छेच्या परिपूर्तीत होते अशा तऱ्हेने केलेल्या स्वत:च्या जननेंद्रियाचे उद्दीपन म्हणजे हस्तमैथुन. आणि वस्तुत: हे मुळी सामाजिक कृत्य नव्हेच. हस्तमैथुन करणारी व्यक्ती दुसऱ्याचे नुकसान करीत नसल्याने तिच्या कृत्यात नीतीचा प्रश्न उद्भवण्याची शक्यता दिसत नाही. अर्थात अशी व्यक्ती स्वत:चे नुकसान करून घेऊ शकेल. म्हणजे एकतर हस्तमैथुनाचा अतिरेक करून- जर हे शक्य असेल तर; किंवा दुसरे म्हणजे असे की एखादी व्यक्ती, विषम-लिंगी समागमासारख्या जास्त आल्हाददायक मार्गांचा ( त्यांच्याबद्दल वाटणाऱ्या फाजील चिंतेमुळे ) त्याग करील; अथवा करावेसे वाटत नसले तरी केवळ पछाडल्याप्रमाणे हस्तमैथुन करून अशी व्यक्ती फक्त हस्तमैथुनामुळे मिळणाऱ्या लैंगिक समाधानालाच चिकटून राहील. या दोन्ही उदाहरणात हस्तमैथुन करणे हे कृत्य त्या व्यक्तीच्या बाबतीत आत्मघातकी व चूक ठरेल. परंतु अशी व्यक्ती भावनिकदृष्टया स्पष्टपणेच प्रक्षुब्ध असणार व म्हणून ती दोषास्पद तर नाहीच पण ती व्यक्ती स्वत:च्या अनिष्ट कृत्यास क्वचितच जबाबदार राहील. वेगळ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे अशी व्यक्ती घातकी लैंगिक वर्तणुकीकडे भीतीमुळे अथवा अपरिपक्वतेमुळे खेचली जाते आणि म्हणून तिला अनैतिक अथवा बेजबाबदार म्हणणे कठीण आहे.

शिवाय, जरी एखादा मनुष्य बेजबाबदार असेल- म्हणजे अशा अर्थाने की त्याला तत्वत: माहीत असेल की स्वत:चे वर्तन तो बदलू शकतो व ते कसे बदलावे हेही त्याला माहीत असेल परंतु तरीसुद्धा तो स्वत:शी व इतरांशी वाईटपणे वागत असेल- तरीसुद्धा तो 'नीच' 'क्षुद्र' किंवा 'नष्टात्मा' नाही तर तो केवळ अपराध अथवा चूक करणारा माणूस आहे, अशा बरवर पाहता

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तऱ्हेवाईक वाटणाऱ्या सिद्धांताचे मी खंबीरपणे समर्थन करतो. अशा माणसाची कृत्ये चूक किंवा अनिष्ट असतीलही; परंतु अशी कृत्ये केल्याबद्दल तो स्वत: 'महाभयंकर' अथवा 'मुक्तिरहित' माणूस होत नाही.

असे का ? कारण पहिली गोष्ट अशी की माणसे नेहमी चुका करणारी किंवा प्रमादशील असतात आणि म्हणून त्यांच्या आयुष्यात त्यांनी चुका करणे हे काही अंशी अपरिहार्यच आहे. दुसरी गोष्ट अशी की माणसे सामान्यत: प्रयत्न-प्रमाद पद्धतीनेच शिकतात, व म्हणून त्यांनी अनेक चुका कराव्यात हे खरोखर त्यांच्या दृष्टीने चांगलेच आहे. तिसरी गोष्ट अशी की जर त्यांनी स्वत:च्या चुकांबद्दल स्वत:ची अमानुषपणे निर्भर्त्सना व नालस्ती केली नाही तर ते स्वत:च्या चुका सुधारू शकतात. चौथी गोष्ट अशी की त्यांचे अंगभूत मूल्य किंवा त्यांची त्यांच्या स्वत:साठी असलेली किंमत काही तरी 'योग्य' कृती करण्यावर अवलंबून नसून केवळ कृती करण्यावर अवलंबून आहे. आणि असे मूल्य त्यांनी काही प्रकारे 'थोर' किंवा 'निर्दोष' असण्यात नाही तर केवळ त्यांनी जिवंत असण्यात, त्यांच्या अस्तित्वात आहे पाचवी गोष्ट अशी की स्वत: अनीतिमान किंवा बेजबाबदार असल्याबद्दल ते जितके स्वत:ला दोष लावतील किंवा स्वत:ला 'नालायक,' 'महापातकी' समजतील, तितके ते स्वत:ची वर्तणूक सुधारण्यास थोडें कमी प्रमादशील होण्याचा प्रयत्न करण्यास असमर्थ होतील. सहावी गोष्ट म्हणजे, माणसाने प्रमाद केल्याने तो महापातकी, पापी ठरतो ही सत्ताशास्त्रीय कल्पना आहे आणि त्या कल्पनेत अशीही कल्पना अभिप्रेत आहे की जगत्चालक अशा माणसावर सूक्ष्मपणे पाहारा करीत आहे व त्याच्या प्रमादांबद्दल जगत्चालक त्याला कोणत्यातरी प्रकारच्या नरकवासात पाठवून देऊन कायमची शिक्षा करील. आणि माणसाकडे व विश्वाकडे पाहण्याचा हा परपीडनासक्त, रोगट दृष्टिकोण आहे व त्याला अर्थातच कोणताही अनुभवाश्रित पुरावा नाही किंवा असणे शक्य नाही अतएव नीतिशास्त्राच्या कोणत्याही शास्त्रीय चर्चेत अशा कल्पनेचा विचार करणे शुद्ध मूर्खपणाचे आहे.

वरील सर्व कारणे विचारात घेता असे म्हणता येईल की जरी मनुष्याने उघडपणे निंद्य वर्तन केले; किंवा त्याने स्वत:च्या चुकीच्या कृत्यांमुळे स्वत:चे व दुसऱ्यांचे नुकसान केले तरी अशा प्रकारे प्रमादशील असल्याबद्दल तो बहुदा 'मूल्यहीन' किंवा दोषार्ह ठरत नाही. तो बेजबाबदार व अनीतिमान जरूर असू शकेल; परंतु तो सदैव एक प्रमादशील 'माणूस' आहे; कवडीमोल नष्टात्मा नाही किंवा य:कश्चित शेणपा नाही. वास्तविक तो जितका स्वत:ला मूलत: चांगला पण एखाद्या क्षणी अगदी अयोग्य किंवा अनिष्ट मनुष्य समजेल


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तितका तो कमी प्रमादशील होण्याची शक्यता अधिक आहे. परंतु जरी तो नेहमी मूर्ख, अज्ञानी, किंवा भावनिक दृष्टया प्रक्षुब्ध राहील, आणि म्हणून सदैव अपराध करणारा राहील, तरीसुद्धा तो ज्याला दोष द्यावा किंवा शिक्षा करावी असा नराधम नाही तर तो फक्त एक दुबळा, पांगा व दुर्दैवी मनुष्य आहे आणि नालस्ती करण्यापेक्षा त्याची जास्त कीवच केली पाहिजे. तो जर खरोखरच समाजघातकी असेल– म्हणजे जर तो चोर असेल, किंवा खुनी असेल व दुसऱ्यांना उपद्रव देण्यास उद्युक्त झालेला असेल– तर त्याला सुरक्षित कोठडीत ठेवावे लागेल म्हणजे तो दुसऱ्यांचा जीवन जगण्याचा अधिकार हिरावून घेऊ शकणार नाही. परंतु तरीसुद्धा तो हरामखोर नाही किंवा हलकट नाही किंवा त्याच्या मानवी, अगदी पूर्णतः मानवी प्रमादशीलतेबद्दल खुनशीपणे शिक्षा करण्यास पात्र नाही.

तर मग भीतीच्या पोटी, किंवा हठप्रवृत्तीने हस्तमैथुन करणारा मनुष्य जर खरोखर रतिसुखाचे जास्त आनंददायक मार्ग सुलभतेने प्राप्त होण्यासारखे असताना ते सोडून देईल व अशा प्रकारे स्वतःच्या कामसुखाच्या उत्कृष्ट उद्दिष्टांचा नायनाट करील तर तो मनुष्य निःसंशयपणे आत्मघातकी आहे व अशा अर्थाने अनैतिक आहे. परतु सर्व प्रमादशील लोकांप्रमाणे त्याला चूक करण्याचा अधिकार आहे. आणि जरी तो स्वतःवर मानसोपचार करून घेणार नसेल तरी त्याला तसा अधिकार दिला पाहिजे व त्याच्या आत्मबलि-दानाबद्दल त्याला कधीही दोष देता कामा नये.

बाहेरख्याली माणसाचे किंवा जो मनुष्य विवाहापूर्वी लैंगिक सुख घेतो त्याच्या बाबतीत काय म्हणता येईल ? तो दोषी अथवा अनैतिक आहे काय ? आपल्या समाजात बरेच लोक आणि समूह त्याला दुर्दैवाने दोषी अथवा अनैतिक समजतात तरी सुद्धा त्याला असे का समजावे हे कळत नाही. जोपर्यंत असा मनुष्य त्याचे विवाहपूर्व संबंध, आपण काय करीत आहोत हे समजण्याइतक्या प्रौढ, परिपक्व व स्वयंस्फूर्तपणे अनुमती देणाऱ्या माणसांशीच मर्यादित ठेवील, व जर तो अशा तारतम्याने वागत असेल की तो स्वतः कायद्याच्या किंवा इतर कोणत्याच अडचणीत सापडणार नाही, तर तो स्वतःचे कोणत्याच प्रकारे नुकसान करणार नाही. इतकेच काय तर अशा प्रकारे तो एका निरुपद्रवी व फायदेशीर मार्गाने अत्यंत आनंददायक काळ घालवील. आणि म्हणून उघडपणे तो स्वतःशी प्रामाणिक राहील.

परत मी आग्रहपूर्वक सांगतो की जोपर्यंत एखादा माणूस आपल्या प्रणयक्रीडेतील जोडीदारांशी खोटे बोलत नाही, किंवा हेतुपुरस्सरपणे त्यांच्यावर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गर्भधारणेचे किंवा गुप्तरोगाचे संकट लादत नाही, किंवा आपली स्वतःची वासना भागविण्यासाठी त्यांच्यावर कोणत्याही प्रकारची सक्ती करीत नाही तोपर्यंत तो कोणताही अपाय करीत नाही. त्या इतर व्यक्ती आपले स्वतःचे निर्णय घेण्यास बहुदा समर्थ असलेल्या स्वतंत्र प्रतिनिधी आहेत. आणि जर त्यांनी असे निर्णय चुकीने घेतले व नंतर आपल्या स्वतःच्या लैंगिक कृत्यांबद्दल त्यांना खंत वाटली तरी स्वतंत्र मानवी व्यक्ती म्हणून इतरांना जो अधिकार असतो तोच अधिकार त्यांना मिळणे हा त्यांचा हक्क आहे– तो हक्क म्हणजे चूक करण्याचा अधिकार, चुकीचे मार्ग चोखाळण्याचे स्वातंत्र्य ! आणि आपण अशी आशा करू की बहुतकरून अशा चुका करून स्वतःबद्दल व इतरांबद्दल काही शिकण्याचे स्वातंत्र्य !

म्हणून प्रौढ माणसांचे त्यांच्या संमतीने घडलेले विवाहापूर्वीचे लैंगिक संबंध हे कधी चूक अथवा अनैतिक होऊ शकतील हे मला कळणेच जवळ-जवळ अशक्य आहे. हे विधान समागमरहित प्रणयसंबंधांच्या बाबतीत ( non-coital relations or petting ) विशेषतः महत्त्वाचे आहे. म्हणजे जर स्त्री-पुरुषांनी प्रणयक्रीडा उत्कर्षबिंदू गाठेपर्यंत केली तर परस्परांची कामपूर्ती करण्याची एक अतिशय निरुपद्रवी व मनोरंजक रीत आहे. व त्यात फायदा असा की गुप्तरोगाची किंवा गर्भधारणेची भीतीही कमी. मी माझ्या Sex Without Guilt आणि The Art and Science of Love या पुस्तकात म्हटले आहे त्याप्रमाणे जर कोणत्या ना कोणत्या कारणांमुळे पूर्ण समागम अशक्य किंवा धोकादायक असेल तर विवाहपूर्ण प्रणयक्रीडा ही विषमलिंगी व्यक्तींच्या मधील विशेष उपयुक्त कृती असते. आणि जर आपल्या अक्कलशून्य समाजात आपण विवाहबाह्य समागमावर बंदी घालणारच असू, किंवा त्याला शिक्षा करणारच असू, तर विवाह न झालेल्या लोकांना प्रणयक्रीडा ( petting ) करण्यास उत्तेजन देण्याची सभ्यता तरी आपण दाखविलीच पाहिजे. तसे केले तर खूपच मानवी फायदे होतील.

ते काही असले तरी स्वखुशीने विवाहपूर्वक लैंगिक संबंध 'नैतिक' शब्दाच्या कोणत्याही रास्त अर्थाने अनैतिक ठरत नाहीत कारण त्यांमुळे संमती असणाऱ्या स्त्रियांचे अथवा पुरुषांचे काहीच नुकसान होत नाही. असे संबंध अनिष्ट आहेत असे मानले तरी तसे संबध ठेवणारे लोक प्रमादशील माणसे आहेत आणि म्हणून 'नालायक' नाहीत. परंतु त्यांची अनैतिकता कधीही सिद्ध झालेली नाही; आणि म्हणून असे संबंध हा नैतिक प्रश्न समजू नये.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विवाहपूर्व लैंगिक संबंध ज्या वर्गात मोडतात त्याच वर्गात व्यभिचार मोडतो काय ? अगदी नेमके तसे नाही. कारण व्यभिचारात निदान एक व्यक्ती अशी असते की ती कायदेशीरपणे दुसऱ्याशी विवाहबद्ध असते; आणि बऱ्याच वेळा दोन्ही व्यभिचारी व्यक्ती एकमेकांशी नव्हे तर दुसऱ्याच दोन व्यक्तींशी विवाहबद्ध असतात. आपल्या समाजात, विवाह सामान्यतः एकपत्नीव्रतानुसार असतो. आणि जे लग्न करतात ते दृढपणे असे प्रतिपादतात किंवा सुचवितात की ते एकमेकांशी लैंगिक बाबतीत बेइमानी करणार नाहीत; मुख्यतः एक-मेकांच्या अपरोक्ष बेइमानी करणार नाहीत. (जसे ते असेही खंबीरपणे सांगतात किंवा सुचवितात की ते त्यांचा दोघांचा पैसा-अडका एकमेकाच्या अपरोक्ष व संमतीशिवाय खर्च करणार नाहीत) परिणामी, जेव्हा एखादा नवरा त्याच्या बायकोला माहीत नसताना दुसऱ्या स्त्रीबरोबर व्यभिचार करतो तेव्हा तो त्याच्या बायकोने त्याच्यावर जो विश्वास ठेवलेला असतो त्याचा सामान्यतः भंग करीत असतो, आणि म्हणून तो विवाहातील उघड व गर्भित कराराच्याबाबत अनैतिक असतो. जर त्याच्या बायकोला त्याच्या व्यभिचाराची माहिती असेल व तिची त्याला संमती असेल तर मग ती वेगळी गोष्ट झाली. परतु आपल्या समाजात बहुतेक वेळा वस्तुस्थिती अशी नसते; व पुरुष ही गोष्ट बायकोच्या अपरोक्ष, निखालस दुटप्पीपणे आणि म्हणून अनैतिकपणे करीत असतो.

म्हणून विवाहित माणसाने केलेला व्यभिचार हा सामान्यतः चूक असतो कारण व्यभिचारी माणूस त्याच्या विवाहित जोडीदाराला विनाकारण फसवीत असतो व इजा करीत असतो. विवाह न केलेला व्यभिचारी पुरुष किंवा विवाह न केलेली व्यभिचारी स्त्री ( म्हणजे जी विवाहित पुरुषाबरोबर भानगड करते) त्यांची स्थिती नैतिक दृष्टया आक्षेपार्ह नसते. कारण जोपर्यंत तिच्या प्रियकराच्या बायकोची ती मैत्रिण नसेल तोपर्यंत तिने आपल्या प्रियकराच्या बायकोशी तिचा नवरा पळवून न नण्याचा काही अलिखित करार केलेला नसतो. अशा वेळी व्यभिचार हा प्रियकराच्या बाबतीत अनैतिक आहे. परंतु प्रेयसीच्या नाही. ( त्याचप्रमाणे एखादा धंदा करणाऱ्या दोन व्यक्तींपैकी एका व्यक्तीने स्वतःचा दुसरा धंदा करण्यासाठी आपल्या भागिदारीतील धंद्यामधील वेळ वापरणे अनिष्ट असेल पण जे लोक अशा व्यक्तीशी तिच्या दुसऱ्या धंद्यासंबंधी व्यवहार करतात ते तसे करण्यात चूक करतात असे नाही. कारण इतर लोक, दुसरा जोडधंदा करणाऱ्या या व्यक्तीच्या एकत्र धंद्यातील भागिदाराशी, नैतिक दृष्टया बांधलेले नाहीत, किंवा कर्तव्यबद्ध नाहीत. )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्यभिचारी व्यक्ती चूक आहे असे गृहीत धरले तर अर्थातच असे म्हणता येईल की त्या व्यक्तीपुढे एक विशिष्ट समस्या आहे आणि ती समस्या सोडविण्याचा उत्तम मार्ग असा : पहिली गोष्ट म्हणजे त्या व्यक्तीने आपण स्वतःच्या जोडीदारासंबंधात अनैतिक वर्तन करीत आहोत हे मान्य करणे. दुसरी गोष्ट म्हणजे आपण स्वतः सहजपणे अनिष्ट वर्तन करू शकतो असे स्खलनशील मानव आहोत या गोष्टीचा स्वीकार करणे आणि तिसरी गोष्ट म्हणजे त्या व्यक्तीने वर्तमानकाळात व भविष्यकाळात थोडे कमी प्रमादशील व म्हणजेच कमी अनिष्ट वर्तन करण्याचा अतिशय निग्रहपूर्वक प्रयत्न करणे. अशा व्यक्तीने प्रमादशील असल्याबद्दल स्वतःची खरडपट्टी काढून अथवा निर्भर्त्सना करून बहुधा काहीच चांगले होणार नाही; उलट त्यामुळे ती व्यक्ती आणखी झपाटल्याप्रमाणे व्यभिचार करण्यास प्रवृत्त होईल. त्याचप्रमाणे ती व्यक्ती स्वतःला शिक्षा करून घेईल तरीसुद्धा बहुधा काही फायदा होणार नाही. परंतु ती व्यक्ती शांतपणे व आत्मनिंदा न करता स्वतःची वर्तणूक अनैतिक आहे हे मान्य करील तर त्या व्यक्तीला स्वतःचे अनिष्ट वर्तन कमी करणे व कालांतराने तसे वर्तन अजिबात न करणे शक्य होईल. वेगळ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे जरी अशी व्यक्ती अनीतिमान असली तरी तिने स्वतःला आपल्या अनैतिक वर्तनाबद्दल दोषी अथवा पापी समजू नये. कारण अपराधी भावना किंवा आत्मनिंदा या गोष्टींचा मुख्य परिणाम म्हणजे अधिकच चुका करणे !

आता आपण लैंगिक विकृतींच्या प्रश्नाकडे वळू या. या संदर्भात तथाकथित लैंगिक विकृतींचे आपण स्पष्टपणे दोन विभाग करू या. विकृत लैंगिक वर्तनाच्या पहिल्या प्रकारात विवाहित अथवा अविवाहित लोक संभोगाच्यापूर्वी अथवा कधीकधी संभोगाऐवजी ज्या संभोगविरहित प्रणयक्रीडा ( non-coital sex acts ) करतात त्यांचा समावेश करता येईल. आणि दुसऱ्या प्रकारात लैंगिक प्रदर्शनप्रियता ( exhibitionism ). दर्शनप्रियता ( voyeurism ) व परपीडनासक्ती ( sadism ) यांचा समावेश करता येईल. शिवाय या दुसऱ्या गटात समलिंगी संभोग ( homosexuality ) व पशुसंभोग ( bestiality ) यांचाही समावेश करता येईल.

मी खंबीरपणे असे म्हणेन ( जसे मी यापूर्वी अनेक वर्षे माझ्या लिखाणातून म्हटले आहे ) की वरीलपैकी पहिल्या वर्गात ज्या समागम-विरहित विभिन्नलिंगी लैंगिक वर्तनाचा समावेश केलेला आहे त्या तऱ्हेच्या लैंगिक वर्तनाची परिणती


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उत्कर्षबिंदू ( orgasm ) पर्यंत पोचण्यात होवो अथवा न होवो, तसे वर्तन ही मुळी विकृती नव्हेच; असे वर्तन तर खरे म्हणजे स्त्री-पुरुषांच्या नैसर्गिक संबंधाचा एक अविभाज्य भाग आहे. इतकेच काय पण मी तर पुढे जाऊन असे म्हणेन की जर पति-पत्नी कोणत्याचवेळी अशा संभोगविरहित प्रणयक्रीडा ( non-coital forms of petting ) करीत नसतील तर तीच गोष्ट लैंगिक दृष्टया विकृत आहे. कारण याचा अर्थ आजकाल सर्वसामान्य शिकलेले लोक विभिन्नलिंगी प्रणयक्रीडा करताना जे पूर्णपणे नैसर्गिक व बहुदा अतिशय आनंद देणारे लैंगिक वर्तन करतात त्यापासून असे जोडपे सदैव भीतीमुळे दूर राहत असणार. तर मग कोणत्याच प्रकारे मी मुख-जननेंद्रिय संबंधासारखं ( oral-genital relations ) व इतर रतिक्रीडेचे प्रकार विकृत मानीत नाही. आणि परिणामी तसे प्रकार अनिष्ट अथवा विकृत का मानले जावेत ते मला कळू शकत नाही. जी व्यक्ति असे वर्तन करते तिला निश्चितच काही अपाय होत नाही आणि तिच्या जोडीदाराचेही लैंगिक समाधान वाढते. जोपर्यंत अशा वर्तनाची कमालीची अतिशयोक्ति होत नाही, किंवा जोपर्यंत अशी व्यक्ती एखाद्या विशिष्ट प्रणयक्रीडेला भीतीमुळे व अनिवार्यपणे चिकटून राहून इतर प्रकारच्या प्रणयक्रीडेतील आनंद उपभोगू शकतच नाही तोपर्यंत अशा प्रकारच्या वर्तनात वावगे असे काहीच नाही आणि आजकालच्या दिवसात जे जोडपे अशा प्रकारच्या समागमविरहित प्रणयक्रीडांतून आनंद उपभोगू शकत नाही असे जोडपे खरोखर विलक्षण म्हटले पाहिजे.

वर उल्लेखिलेल्या दुसऱ्या गटातील लैंगिक विकृती या खऱ्या विकृती आहेत व त्या आत्मघातकी आहेत म्हणून त्यांना अनैतिक म्हणता येईल. उदाहरणार्थ, जो मनुष्य मुख्यतः आपले अनावृत शरीर स्त्रियांना फक्त दाखविण्यातच समाधान मानतो तो बहुधा लाजरा-बुजरा असतो, व प्रतिरोधित ( inhibited ) मनुष्य असतो. आणि स्त्रियांबरोबर प्रत्यक्ष संभोग-सुख घेण्याची त्याला अतिशय भीती वाटत असते म्हणून तो बहुदा अशा कमअस्सल प्रतीच्या लैंगिक सुखाचा अनिवार्यपणे आश्रय घेतो. जो पुरुष स्थिरस्थित समलिंगी ( fixed homosexual ) असतो व फक्त इतर पुरुषांशीच लैंगिक संबंध ठेवतो, स्त्रियांशी कधीच ठेवीत नाही, त्याला अशी भीती वाटत असते की स्त्रिया त्याला झिडकारतील किंवा त्यांच्याबरोबर संभोगसुख घेण्याचा प्रयत्न केल्यास तो नपुंसक ठरेल, किंवा त्याला अशी भीती वाटत असते की स्त्री-पुरुष संबंधाची अथवा विवाहाची जबाबदारी आपल्याला पेलणार नाही. आणि म्हणून त्याने अबोधपणे स्त्रियांऐवजी पुरुषांमुळेच स्वतःलाच उद्दीपित करण्यास


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शब्दशः शिकविलेले असते. अशा प्रकारे लैंगिक विकृतींनी ग्रासलेले लोक भावनिक दृष्टया कमालीचे अस्थिर असतात आपल्या भीतीच्या आहारी जाऊन ते तत्कालिक सुखासाठी दूरवरच्या फायद्याचा त्याग करीत असतात. मी त्यांना अदूरदर्शी सुखवादी किंवा ऐदी म्हणतो आणि सरतेशेवटी अशी माणसे विभिन्नलिंगी कामक्रीडेतून आणि वैवाहिक संबंधातून जे अपायहीन व उत्कट समाधान मिळणे शक्य असते त्याला बहुदा नेहमी तिलांजली देतात. व स्वतःवर अनेक गैरसोयी व दुःख ओढवून घेतात.

याशिवाय, स्वतःच्या लैंगिक प्रदर्शनप्रियतेमळे जे पुरुष स्त्रियांना उपद्रव देतात किंवा जे समलिंगी पुरुष अगदी लहान मुलांना कुमार्गाला लावतात अशा प्रकारचे विकृत लोक स्वतःखेरीज इतरांना विनाकारण त्रास देतात व अपाय करतात आणि म्हणून सामाजिक दृष्टया ते अनैतिक असतात. परंतु बऱ्याचवेळा खऱ्या लैंगिक विकृतींनी पछाडलेले लोक समाजविद्रोही असण्यापेक्षा आत्मघातकी असतात व त्यांचे अनैतिक वर्तन स्वतःविरुद्धच उद्युक्त झालेले दिसते. स्वतःच्या विकृत वर्तनाविषयी ते बऱ्याच वेळा असे तर्कट रचतात की त्यांच्या लैंगिक रुची व आवडी-निवडी सर्वसामान्य माणसांपेक्षा काहीशा वेगळ्या आहेत व त्यांच्या या विशिष्ट आवडी-निवडी जन्मतःच वेगळ्या आहेत आणि स्वतःच्या या विशिष्ट प्रवृत्तींपुढे त्यांचा इलाजच चालत नाही. परंतु असे लोक भावनिक दृष्टया कमालीचे अस्थिर असतात व मी आणि इतर मानसोपचारतज्ज्ञांनी अशा विकृत लोकांवर उपचार करून वारंवार सिद्ध केले आहे की असे लोक सुधारू शकतात व त्यांच्या विकृतींवर मात करू शकतात. परंतु अंशतः त्यांच्या मनोविकृतीमुळे आणि त्यांच्या सारभूत आळसामुळे ते बहुधा मानसोपचार करून घेण्यासाठी जात नाहीत अथवा स्वतःची लैंगिक विकृती नष्ट करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत नाहीत.

परंतु लैंगिक बाबतीत अगदी निर्ढावलेल्या पदच्युत व्यक्तींचे वर्तन कितीही आत्मघातकी अथवा प्रसंगी सामाजिक दृष्टया अपायकारक असले तरी माझे असे ठाम मत आहे की अशा व्यक्तींना चुकीचे किंवा अनिष्ट वर्तन करण्याचा अधिकार आहे; आणि असे विकृत वर्तन करण्याबद्दल त्यांना दोष देणे अथवा शिक्षा करणे योग्य नाही. खादाड माणसांना अथवा धूम्रपान करणाऱ्या माणसांना ज्याप्रमाणे खादाडीचे किंवा धूम्रपानाचे व्यसन असण्याचा अधिकार आहे त्याप्रमाणे वरील तऱ्हेच्या व्यक्तींना स्वतःला अपाय करणारे अनिष्ट वर्तन करण्याचा अधिकार आहे. लैंगिकदृष्टया मार्गच्युत असणाऱ्या व्यक्तींना, त्यांनी आपले लैंगिक दुर्गुण सोडून द्यावेत म्हणून, समाजाने सर्वतोपरीने शिक्षण

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

देण्याचा अथवा सुधारण्याचा प्रयत्न जरूर केला पाहिजे. परंतु अशा व्यक्ति जोपर्यंत खरोखरच अकारण दुसऱ्यांना इजा करीत नाहीत व परिणामी स्वतःच्या दुर्गुणांचे रूपांतर गुन्ह्यात करीत नाहीत तोपर्यंत समाजाने त्यांच्यावर शिक्षणाची जबरदस्ती करता कामा नये आणि जरी अशा व्यक्तीच्या दुर्गुणांचे रूपांतर गुन्ह्यात झाले तरी त्यांच्या समाजविरोधी लैंगिक पदच्युतीबद्दल समाजाने त्यांची नालस्ती न करता किंवा त्यांना शिक्षा न करता त्यांना सुरक्षित तुरुंगात ठेवावे. याहीपेक्षा चांगला मार्ग म्हणजे अशा व्यक्तींना मनोरुग्णांना प्रवेश देणाऱ्या इस्पितळात ठेवावे. आणि स्वतःच्या विकृत वर्तनाने ते दुसऱ्यांना अपाय करणार नाहीत अशी खात्री होईपर्यंत त्यांच्यावर मानसोपचार करावेत. त्याचप्रमाणे अशा व्यक्तींना आपण अपराधी आहोत, पापी आहोत असेही वाटावयास लावता कामा नये; किंवा त्यांना आत्मनिंदेसही उद्युक्त करता कामा नये. कारण, अशा व्यक्तींपैकी कित्येकांच्या मनात अगोदरच अपराधी भावना व आत्मनिर्भर्त्सना खूप खोलवर रुजलेल्या असतात. आणि त्यामुळेच अशा व्यक्ती कुमार्गी बनतात व तशा राहतात व चुकीने असे समजतात की जास्त नैसर्गिक कामजीवनास आपण असमर्थ आहोत.

म्हणून मी दृढपणे असे म्हणतो की अगदी पराकोटीच्या वाईट व निर्ढावलेल्या लैंगिक गुन्हेगारांनासुद्धा स्वतःबाबत व इतरांबाबत रोगटपणे वागण्याचा व चक्रमपणे विचार करण्याचा अधिकार आहे. अर्थात जोपर्यंत लैंगिक गुन्हेगार असेच बेकायदेशीर वर्तन करतील अशी चांगलीच शक्यता वाटते तोपर्यंत लैंगिक गुन्ह्यांविरुद्ध कायदे करण्याचा व गुन्हेगारांना सुरक्षित तुरुंगात डांबण्याचा अधिकार समाजाला जरूर आहे. परंतु जे लोक मूर्ख, अज्ञानी व मानसिकदृष्ट्या अस्थिर आहेत त्यांची तसे असण्याबद्दल निंदा करून, त्यांना अपराधी वाटावयास लावून व आत्मनिंदेस उद्युक्त करून ते लोक सुधारतील अशी अपेक्षा करणे निखालस मूर्खपणाचे व गुन्ह्याला उत्तेजन देण्यासारखे आहे.

सूज्ञ व बोधप्रद लैंगिक शिक्षण म्हणजे समलिंगी–समागम अथवा बलात्कार यांसारख्या कृती करणाऱ्या व्यक्तीला तिचे वर्तन आत्मघातकी किंवा समाजद्रोही असते हे दाखवून देण्याची पद्धती होय. शिवाय जो मनुष्य असे अयोग्य वर्तन करतो तो मनुष्य अपरिहार्यतः प्रमादशील मानव आहे हे मान्य करणे; त्याची अशी खात्री पटविणे की त्याच्याजवळ स्वतःच्या लैंगिक अथवा इतर समस्यांसंबंधी जास्त निर्दोषपणे, दूरदृष्टीने व हुशारीने विचार करण्याची व समंजस वर्तन करण्याची पात्रता निश्चित आहे; आणि त्याला भविष्यकाळात मानवी संबंधात कमी आत्मघातकीपणे अथवा कमी समाजविरोधीपणे वागण्यास,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याची निंदा न करता, शांतपणे, वस्तुनिष्ठ दृष्टिकोणातून मदत करणे या गोष्टींचाही समावेश लैंगिक शिक्षणाच्या प्रक्रियेत अंतर्भूत आहे. लैंगिक बाबतीतील अथवा इतर बाबतीतील शिक्षणात आपली स्वतःची जबाबदारी उचलणे व दुसऱ्यांसंबंधीची जबाबदारी पार पाडणे या गोष्टींना जरूर स्थान आहे; मात्र पाप व अपराधी भावनांच्या जोपासनेला खचितच स्थान नाही.

जेव्हा तुम्ही चुकीच्या अथवा अनिष्ट कृत्यांबद्दल जबाबदारी मान्य करता तेव्हा तुम्ही स्वतःला व इतरांना सांगत असता : ( अ ) हे कृत्य निर्विवादपणे मी केले आहे अथवा ते करण्यास कारणीभूत झालो आहे ( ब ) आणि आता त्याचे परिमार्जन करण्यासाठी— शक्य असेल तर — मी काय करू शकतो ? आणि पुन्हा तसे कृत्य न करण्यासाठी मला कोणता उपाय करता येईल ? परंतु तुम्ही पाप-भावनेने अथवा अपराधी भावनेने ग्रासले जाता तेव्हा तुम्ही स्वतःशी म्हणता : ( अ ) मी हे अनिष्ट कृत्य केले आहे. ( ब ) असे वर्तन केल्यामुळे मी नालायक, क्षुद्र माणूस ठरलो आहे. ( क ) मी असा नालायक असल्याबद्दल स्वतःला कशाप्रकारे शिक्षा करून घेऊ ? ( ड ) माझ्यासारख्या भयंकर पापी माणसाला भविष्यकाळात अशा तऱ्हेची कित्येक दुष्कृत्ये करण्यास प्रतिबंध घालणे कसे शक्य आहे ? म्हणजे जेव्हा तुम्ही अनैतिक वर्तन कराल तेव्हा स्वतःच्या जबाबदारीच्या जाणिवेमुळे भविष्यकाळात कमी चूक करण्यास व कमी अनिष्टपणे वागण्यास मदत होईल. परंतु पापी अथवा अपराधी भावनेची परिणती स्वतःची निंदा करण्यात व स्वतःला शिक्षा करण्यात होते आणि त्यामुळे नंतर तुमची प्रवृत्ती उलट जास्त अनैतिक व जास्त अनिष्ट वर्तन करण्याकडेच होते.

या सगळ्याचा मानसिक स्वास्थ्याशी काय संबंध आहे ? मला वाटते खूपच संबंध आहे. स्वाभिमान याचा अर्थ तुम्हाला वैयक्तिक ‘ मूल्य ’ किंवा ‘ लायकी ’ आहे असे वाटणे; व या जगात ज्या काही थोड्या वर्षांचे आयुष्य तुम्हाला मिळण्याची अपेक्षा आहे त्या आयुष्यात तुम्ही काही प्रमाणात सुख मिळवू शकाल अशी माफक खात्री वाटणे. म्हणून शहाणा माणूस तो केवळ जिवंत असतो, व त्याच्याजवळ आनंद उपभोगण्याची पात्रता असते म्हणून स्वतःचा बिनशर्तपणे स्वीकार करतो. आणि तो स्वतःच्या आयुष्याची कदर करतो व स्वतःच्या सुखाची कदर करतो म्हणून त्याला असेही समजते की तो स्वतः एक सामाजिक समूहाचा अटळपणे भाग असल्यामुळे त्या समूहातील व्यक्तींना अकारण इजा न करण्यासाठी त्याने शक्य तेवढी पराकाष्ठा केली पाहिजे म्हणजेच तो खऱ्या अर्थाने स्वतःचे नुकसान करून घेण्याचे टाळू शकेल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणजे चांगले 'स्वत्व' असलेला मनुष्य प्रथम आपले आयुष्य दीर्घकाल टिकविण्यासाठी उत्तम काळजी घेतो आणि त्याच्या आयुष्यात त्याला नेमकी कोणती गोष्ट आनंद देऊ शकते ते शोधून काढतो आणि जेव्हा व्यवहार्य असेल तेव्हा तो असे वैयक्तिक सुख उपभोगतो– मग इतरेजन त्याच्याशी सहमत होवोत वा न होवोत आणि असा आनंद उपभोगल्याबद्दल तो इतरांच्या पसंतीला उतरो अथवा न उतरो! अशाप्रकारे तो मुख्यतः स्वतःशी प्रामाणिक असतो.

परंतु शहाण्या मनुष्याच्या सुख उपभोगण्यामुळे जेव्हा खरोखर दुसऱ्यांच्या संतोषावर गदा येते आणि त्याला जेव्हा कळते की स्वतःच्या क्षणिक अथवा दूरवरच्या हिताच्या दृष्टिकोणातून पाहता त्याने दुसऱ्यांच्या उद्दिष्टांवर अतिक्रमण करण्यामुळे खरोखरच त्याच्या स्वतःच्या ध्येयाचा पाडावा होईल, किंवा त्यामुळे असे जग निर्माण करण्यास मदत होईल की त्यात त्याला राहणे आवडणार नाही, तेव्हा तो स्वतःच्या क्षणिक सुखाच्या आसक्तीचा फिरून विचार करील आणि क्षणिक सुख-प्राप्तीचा प्रयत्न जर खरोखर अनैतिक किंवा समाजविरोधी असेल तर अशा उद्दिष्टात तो फेरफार करील. वेगळ्या शब्दात म्हणजे तो स्वतःच्या आयुष्याशी व सुखाशी तादात्म्य झालेला असतो. आणि जर तो भविष्याचा विचार करीत असेलच तर आपो-आपच त्याची ही तादात्म्यता त्याला त्याच्या कृतींचा सामाजिक परिणाम काय होईल व अशा परिणामांची कोणती फळे त्याला स्वतःला व त्याच्या प्रियजनांना भोगावी लागतील याचा विचार करावयास लावते.

माणसांच्या काही कृतींचा सामाजिक परिणाम होत नसेलही. उदाहरणार्थ, एखाद्यापुढे असा प्रश्न आहे की मैत्रिणींच्या बरोबर रात्र जागण्याच्या क्षणिक सुखापेक्षा अभ्यास करून महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करून दूरवरच्या फाय-द्याची तरतूद करावी काय? हा वैयक्तिक प्रश्न सोडवितानाही, ज्या माणसाला चांगली स्वत्वाची जाणीव असेल अथवा स्वतःला मूल्य आहे असे वाटत असेल, असा मनुष्य आपल्या ७०-८० वर्षांच्या आयुष्यात दूरवरच्या साध्याचीच निवड करतो व अशी निवड केल्याने त्याला स्वतःच्या ७०-८० वर्षांच्या आयुष्यात जास्तीत जास्त सुख प्राप्त होते. शहाणपण म्हणजे स्वतःची सजीवता पूर्णपणे स्वीकारून व आदरून ती टिकविण्याचा सतत विचार व प्रयत्न करणे आणि तिचा अशा प्रकारे उपयोग करणे की नजिकच्या व दूरवरच्या दृष्टीने जास्तीत जास्त आनंद मिळेल. माझ्या दृष्टीने स्वत्वाची चांगली जाणीव किंवा स्वत्वाचे मोल म्हणजे दुसरे तिसरे काही नसून वैयक्तिक व सामाजिक नीतीचे समजस विचार व आचार होत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याची निंदा न करता, शांतपणे, वस्तुनिष्ठ दृष्टिकोणातून मदत करणे या गोष्टींचाही समावेश लैंगिक शिक्षणाच्या प्रक्रियेत अंतर्भूत आहे. लैंगिक बाबतीतील अथवा इतर बाबतीतील शिक्षणात आपली स्वतःची जबाबदारी उचलणे व दुसऱ्यांसंबंधीची जबाबदारी पार पाडणे या गोष्टींना जरूर स्थान आहे; मात्र पाप व अपराधी भावनांच्या जोपासनेला खचितच स्थान नाही.

जेव्हा तुम्ही चुकीच्या अथवा अनिष्ट कृत्यांबद्दल जबाबदारी मान्य करता तेव्हा तुम्ही स्वतःला व इतरांना सांगत असता : ( अ ) हे कृत्य निर्विवादपणे मी केले आहे अथवा ते करण्यास कारणीभूत झालो आहे ( ब ) आणि आता त्याचे परिमार्जन करण्यासाठी— शक्य असेल तर— मी काय करू शकतो ? आणि पुन्हा तसे कृत्य न करण्यासाठी मला कोणता उपाय करता येईल ? परंतु तुम्ही पाप-भावनेने अथवा अपराधी भावनेने ग्रासले जाता तेव्हा तुम्ही स्वतःशी म्हणता : ( अ ) मी हे अनिष्ट कृत्य केले आहे. ( ब ) असे वर्तन केल्यामुळे मी नालायक, क्षुद्र माणूस ठरलो आहे. ( क ) मी असा नालायक असल्याबद्दल स्वतःला कशाप्रकारे शिक्षा करून घेऊ ? ( ड ) माझ्यासारख्या भयंकर पापी माणसाला भविष्यकाळात अशा तऱ्हेची कित्येक दुष्कृत्ये करण्यास प्रतिबंध घालणे कसे शक्य आहे ? म्हणजे जेव्हा तुम्ही अनैतिक वर्तन कराल तेव्हा स्वतःच्या जबाबदारीच्या जाणिवेमुळे भविष्यकाळात कमी चूक करण्यास व कमी अनिष्टपणे वागण्यास मदत होईल. परंतु पापी अथवा अपराधी भावनेची परिणती स्वतःची निंदा करण्यात व स्वतःला शिक्षा करण्यात होते आणि त्यामुळे नंतर तुमची प्रवृत्ती उलट जास्त अनैतिक व जास्त अनिष्ट वर्तन करण्याकडेच होते.

या सगळ्याचा मानसिक स्वास्थ्याशी काय संबंध आहे ? मला वाटते खूपच संबंध आहे. स्वाभिमान याचा अर्थ तुम्हाला वैयक्तिक ‘ मूल्य ’ किंवा ‘ लायकी ’ आहे असे वाटणे; व या जगात ज्या काही थोड्या वर्षांचे आयुष्य तुम्हाला मिळण्याची अपेक्षा आहे त्या आयुष्यात तुम्ही काही प्रमाणात सुख मिळवू शकाल अशी माफक खात्री वाटणे. म्हणून शहाणा माणूस तो केवळ जिवंत असतो, व त्याच्याजवळ आनंद उपभोगण्याची पात्रता असते म्हणून स्वतःचा बिनशर्तपणे स्वीकार करतो. आणि तो स्वतःच्या आयुष्याची कदर करतो व स्वतःच्या सुखाची कदर करतो म्हणून त्याला असेही समजते की तो स्वतः एक सामाजिक समूहाचा अटळपणे भाग असल्यामुळे त्या समूहातील व्यक्तींना अकारण इजा न करण्यासाठी त्याने शक्य तेवढी पराकाष्ठा केली पाहिजे म्हणजेच तो खऱ्या अर्थाने स्वतःचे नुकसान करून घेण्याचे टाळू शकेल.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणजे चांगले 'स्वत्व' असलेला मनुष्य प्रथम आपले आयुष्य दीर्घकाल टिकविण्यासाठी उत्तम काळजी घेतो आणि त्याच्या आयुष्यात त्याला नेमकी कोणती गोष्ट आनंद देऊ शकते ते शोधून काढतो आणि जेव्हा व्यवहार्य असेल तेव्हा तो असे वैयक्तिक सुख उपभोगतो– मग इतरेजन त्याच्याशी सहमत होवोत वा न होवोत आणि असा आनंद उपभोगल्याबद्दल तो इतरांच्या पसंतीला उतरो अथवा न उतरो! अशाप्रकारे तो मुख्यतः स्वतःशी प्रामाणिक असतो.

परंतु शहाण्या मनुष्याच्या सुख उपभोगण्यामुळे जेव्हा खरोखर दुसऱ्यांच्या संतोषावर गदा येते आणि त्याला जेव्हा कळते की स्वतःच्या क्षणिक अथवा दूरवरच्या हिताच्या दृष्टिकोणातून पाहता त्याने दुसऱ्यांच्या उद्दिष्टांवर अतिक्रमण करण्यामुळे खरोखरच त्याच्या स्वतःच्या ध्येयाचा पाडाव होईल, किंवा त्यामुळे असे जग निर्माण करण्यास मदत होईल की त्यात त्याला राहणे आवडणार नाही, तेव्हा तो स्वतःच्या क्षणिक सुखाच्या आसक्तीचा फिरून विचार करील आणि क्षणिक सुख–प्राप्तीचा प्रयत्न जर खरोखर अनैतिक किंवा समाजविरोधी असेल तर अशा उद्दिष्टात तो फेरफार करील. वेगळ्या शब्दात म्हणजे तो स्वतःच्या आयुष्याशी व सुखाशी तादात्म्य झालेला असतो. आणि जर तो भविष्याचा विचार करीत असेलच तर आपो-आपच त्याची ही तादात्म्यता त्याला त्याच्या कृतींचा सामाजिक परिणाम काय होईल व अशा परिणामांची कोणती फळे त्याला स्वतःला व त्याच्या प्रियजनांना भोगावी लागतील याचा विचार करावयास लावते.

माणसांच्या काही कृतींचा सामाजिक परिणाम होत नसेलही. उदाहरणार्थ, एखाद्यापुढे असा प्रश्न आहे की मैत्रिणींच्या बरोबर रात्र जागण्याच्या क्षणिक सुखापेक्षा अभ्यास करून महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करून दूरवरच्या फाय-द्याची तरतूद करावी काय? हा वैयक्तिक प्रश्न सोडवितानाही, ज्या माणसाला चांगली स्वत्वाची जाणीव असेल अथवा स्वतःला मूल्य आहे असे वाटत असेल, असा मनुष्य आपल्या ७०-८० वर्षांच्या आयुष्यात दूरवरच्या साध्याचीच निवड करतो व अशी निवड केल्याने त्याला स्वतःच्या ७०–८० वर्षांच्या आयुष्यात जास्तीत जास्त सुख प्राप्त होते. शहाणपण म्हणजे स्वतःची सजीवता पूर्णपणे स्वीकारून व आदरून ती टिकविण्याचा सतत विचार व प्रयत्न करणे आणि तिचा अशा प्रकारे उपयोग करणे की नजिकच्या व दूरवरच्या दृष्टीने जास्तीत जास्त आनंद मिळेल. माझ्या दृष्टीने स्वत्वाची चांगली जाणीव किंवा स्वत्वाचे मोल म्हणजे दुसरे तिसरे काही नसून वैयक्तिक व सामाजिक नीतीचे समजस विचार व आचार होत.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मी जे सर्व सांगत आहे त्यात कुमारांचे अथवा तरुणांचे स्थान काय आहे ? तरुण लोक माणसेच असतात आणि म्हणून त्यांच्यात नैसर्गिकरीत्या मानवी सुप्तशक्ती व स्खलनशीलता वास करीत असतात असे मानण्याइतका मी व्यक्तिशः पूर्वग्रहदूषित आहे ! ते प्रौढ होत असलेले लोक असतात; बऱ्याच वेळा ते सर्वसामान्यांहून उघडपणे जास्त बुद्धिमान असतात; आणि या गोष्टींची जाण त्यांनी स्वतः व त्यांच्या वडीलधाऱ्यांनी ठेवली तर फार उत्तम होईल. परंतु समाजाने त्यांना योग्यप्रकारे मान दिला किंवा नाही– आणि आज त्यांना तसा मान दिला जात नाही आणि त्यांच्या भोवतीची वडीलधारी मंडळी व विशेषतः आई-वडील त्यांना लहान मुलेच समजता ही गोष्ट नाकारून चालणार नाही– तरी त्यांना स्वतः पूर्णपणे स्वीकार का करता येऊ नये, आणि चुका करण्याचा, प्रमादशील असण्याचा अधिकार त्यांनी स्वतःला का देऊ नये, आणि जसे जसे ते प्रौढ होत जातील तसे तसे प्रयोगांती ते थोडे कमी प्रमादशील व कमी अकार्यक्षम का होऊ नयेत हे मला कळत नाही. शालेय व इतर कार्यात चांगले यशस्वी होण्याचा त्यांनी सर्वतोपरीने जरूर प्रयत्न करावा. परंतु माझी अशी आशा आहे की आज त्यांच्या भोवती असलेली बहुतेक अचरट वडीलधारी माणसे स्वतःचे कार्य व स्वतःचे स्वत्व यांची गल्लत करतात तसे करून तरुण मंडळींनी स्वतःचा अनाठाई छळ करू नये. लोकांना तुम्ही आवडता व म्हणून त्यांनी तुम्हाला रतिसुखाच्या बाबतीत अथवा इतर बाबतीत साहाय्य केले तर उत्तमच आहे. परंतु ‘ उत्तम ’ या शब्दाचा अर्थ ‘आवश्यक’ असा कधीही होत नाही. तुम्ही अल्पसंख्याक समूहात असाल, अगदी एकटे असाल तरी तुम्ही स्वतःवर प्रेम करू शकता व बऱ्याच प्रमाणात आनंदी राहू शकता.

सारांशाने सांगावयाचे म्हणजे अनीती किंवा प्रमाद म्हणजे असे कृत्य करणे की ज्यामुळे स्वतःला किंवा इतरांना अकारण इजा करता. परिणामी लैंगिक प्रमाद म्हणजे समलिंगी–समागमासारख्या अशा कृती की ज्यामुळे तुमचे स्वतःचे नुकसान होते व त्या कृती तुम्हाला इतर निरुपद्रवी सुखांपासून परावृत्त करतात; किंवा बलात्कारासारख्या अशा कृती की ज्या करताना तुम्ही उघडपणे व विनाकारण दुसऱ्याचे नुकसान करता. तुम्ही जेव्हा लैंगिक प्रमाद करता तेव्हा सामान्यतः तुम्हीच त्याला जबाबदार असता. अर्थात काही अपवादात्मक प्रसंगी असेही होते की तुमच्या मनावरचा ताबा इतका कमालीचा सुटलेला असतो की तुम्ही काय करता याच्यावर तुमचे खरोखर काहीच नियंत्रण राहात नाही. परंतु जेव्हा तुम्ही तुमच्या आत्मघातकी व समाजविरोधी कृत्यां-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बद्दल पूर्णपणे जबाबदार असता तेव्हाही ते कृत्य करण्याबद्दल तुम्ही ' नालायक ' अथवा ' गंदी ' ठरत नाही. ज्याने चूक केली आहे असे तुम्ही केवळ प्रमादशील मानव असता; आणि अशावेळी स्वतःची चूक प्रांजळपणे मान्य करावी व ती पुन्हा होण्याची शक्यता कमी करण्याच्या प्रयत्नाला लागावे हे उत्तम. लैंगिक प्रमादातून उद्भवणारी अपराधी भावना सदैव अयोग्य आहे– होय अगदी नेहमी अयोग्य आहे. त्या भावनेचा उगम खालील तऱ्हेच्या दोन वाक्यांतून होतो. ( १ ) " या विशिष्ट प्रकारच्या लैंगिक कृती करण्यात माझी चूक झाली असावी आणि माझी चूक झाली असेल तर मी त्याला जबाबदार आहे. " हे शहाणपणाचे वाक्य व ( २ ) जर अशा प्रकारचा उघड लैंगिक प्रमाद करण्यास मी जबाबदार असेन तर याचा अर्थ मी पापी, नालायक माणूस आहे " हा पूर्णपणे वेडा विचार ! ज्यावेळी तुम्ही एखादे संशयास्पद लैंगिक कृत्य केले असेल अथवा करण्याच्या विचारात असाल त्यावेळी वरीलपैकी पहिल्या वाक्या-वर वाटल्यास जरूर लक्ष केंद्रित करा; पण वरीलपैकी दुसऱ्या वाक्यामागे दडलेल्या, स्वतःला अप्रतिष्ठा आणणाऱ्या व म्हणून स्वभावतःच विघातक, नकारात्मक व अनैतिक असणाऱ्या मतप्रणालीची जोमदारपणे चिकित्सा व छाननी करा. स्वतःचे लैंगिक प्रमाद कबूल करणे व ते भविष्यकाळात शक्यतो कमी करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे परिपक्व, वास्तववादी वर्तन करणे होय. परंतु कोणत्याही पूर्वीच्या, सध्याच्या अथवा शक्यकोटीतील लैंगिक प्रमादाबद्दल स्वतःला दोष लावणे म्हणजे कमालीचे अनैतिक व अपरिपक्व वर्तन करण्या-सारखे आहे तुम्ही लैंगिकदृष्टया चूक अथवा बरोबर असलात किंवा शहाणे अथवा मूर्ख असलात तरी तुमची पहिली व सर्वांत महत्त्वाची जबाबदारी म्हणजे स्वतःशी प्रामाणिक राहणे ! ही जबाबदारी स्वीकारण्याच्या कठीण कामाला तुम्ही केव्हा सुरवात करणार ?





अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ॰ सुरेश म॰ डोळके

# श्रीचक्रधरनिरूपित (?) 'संपूर्ण' श्रीकृष्णचरित्र : ५ :

## [ संहिता : लेखांक ४ ]

ब्रह्मेदीकअभ्यर्थनी अर्जूनदेवा अव्हान– कथन : ॥ ॥

एकु दी महदाइसी पुसिलें : "जी जी : कूरुक्षेत्र संपलेंयाऊपरि श्रीकृष्णचक्रवर्ति कीती दीवस राज्य केलें ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : कुरुक्षेत्र संपलेंयानंतरें बत्तीस वर्षें राज्य केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति द्वारकेसि राज्य करीता श्रीकृष्णचक्रवर्तीचे कूमर आन छेपन्न कोडी यादव हे अवघे सूरापाण करीत : मत द्रवे सेवीति : असे सदा ऊनमत्त असति : श्रीकृष्णचक्रवर्ति भणितलें : 'मत्त द्रव्ये न सेवागा : न सेवागा : अेनें कूळहनन होइल' : असें श्रीकृष्णचक्रवर्त्ति बहूत ऊपपत्ती कथूणि नीतीमार्गें ऊपदेशीति : परि ते वर्जीलें : नाइकेति : मग एकु दी श्रीकृष्णचक्रवर्ति प्रद्यूम्णातें भणितलें : 'तूम्ही वज्रपूरीसि जा : तेथीचें राज्य करा : आता हे अवघे यादव परस्परें कळहो करूणि अेकमेकातें मारीती : जंववेन्ही मेरू अचळ असैल तंववेन्ही तू चीरंजीव होसी' : असा वरु दीधला : मग प्रद्यूम्ण दंडवतें करूणि वज्रपूरीसि गेला : मग ब्रह्मेदीक आले : तेही श्रीकृष्णचक्रवर्त्तिची स्तूति करूणि वीनवीलें : 'जी जी : यूगाची सीमा अतीक्रमली : बीजें कीजो असें जाणवीलें' : श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि साता दीवसाची गडे सागौणि पाठविली : मग इंद्र आला : इंद्रें श्रीकृष्णचक्रवर्त्तिची स्तूति केली : मग इंद्रे भणितलें : 'जी मृत्यलोकासि आन स्वर्गासि वाट असे : ते मोडु लाभे' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति मानीलें : मग इंद्र दंडवतें करूणि नीगाला : तेणें तो मार्गु मोडीला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति पांडवासि सांघौणि पाठवीलें : तेव्हळि अर्जून भेटो आले : भेटले : अर्जूनासि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूनहो : आता कळियूग रीगैल : अेथ राहो नये : तूम्ही ऊत्तरापंथें जावें : हे नीजधामा जाइल : आता आठवा दीवसी भील चालतील : गोपीका नेइजतील : भीलराज्य

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होइल : तूम्ही अेथ न राहावें :। : अेथ माहामंत्र न स्फूरेति : क्षूद्र वीद्या स्फूरेति :। : अधर्मे धर्मं लोपती : देवेंधर्मेंवीन संसार शून्य : अवघे ऊंपहत होइल ’ : तंवं व्रजा आलीया : तयासि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ हे गेलेंयानंतरें तूम्ही आपूले देहत्याग करा : अैसें न करा तरि भील्ली नेइजाल ’ : मग व्रजा बोलीलीया : ‘ जी जी : आम्ही या संसारासि त्रसलो : आम्ही सर्वज्ञांचीया कींकरी : आपूले सकळ कुळाचारधर्म सांडौणि सर्वज्ञातें सेवीलें : आता आमचा अव्हेरु सर्वज्ञ का करीताति ? ’ : भणौनि वृजा दूख करू लागलीया : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयासि वीज्ञान प्रकटीलें : दूखनीवृत्ति केली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ तूम्ही कळयूगी न राहावेंहो ’ : तेव्हळि अर्जून श्रीकृष्णचक्रवर्तीसि दंडवतें केली : नीगाले : नीगता श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ तूम्ही मागौतें अेथीचें अेक दर्शन घेईजे हो ’ : अर्जून यूधीष्ठीराजवळि गेले : अवघा वृत्तांत सांघीतला : ते आइकौणि पांडव आदकले : थोर दूःख जालें : आन देशी तडें पडीली : बाइ : अैसें देखौणि ऋक्मीणीदेवी भणितलें : ‘ हे काइ जी ? ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितले : ‘ आता हे अैसेंचि ! ’ : भणौनि आपूलीये श्रीमूर्त्तिवरि छेदाचे अनूकार केले : अैसी प्रवृत्ती जानौणि ऋक्मीणीदेवीचें ऊभीयाचि देह गेलें ! : आन वृंदेचेंही गेलें : मग वृंदा ऊपाये देहत्यागु केला ” : ॥१००॥

ब्राह्मणश्यापनीमीत्त यादवानाशु– कथन : ॥ ॥

महदाइसी पुसिलें : “ जी जी : ऋषी यादवा कां श्यापीलें ते नीरोपावें जी ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि बीजें कराव[या*]ची प्रवृत्ती : दूर्वासदेव मख्यकरूणि समस्त ऋषी मानसीकें व्याकूळ चींताग्रस्त अैसे द्वारकेचा भूवनी बैसले होते : तंवं तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्तिचे कुमर खेळतखेळत गेले : तेही भणितलें : ‘ आरे हे ऋषी आपणयातें नीराहारी म्हणवीत असति : आन आमचेया पीतेया श्रीकृष्णासि बाळब्रह्मचारी सांगताति : तरि या पा यासी काही पूसो : कैसे पा जाणती ’ भणौनि चेष्टा करू आदरीली : मग श्रीकृष्णवर्त्तिचा कूमरी श्यांबासि स्त्रीवेष दीधला : तयाचा पोटी काठवठि बांधली : वरि वस्त्रें आछादीलें : मग गर्भ केला : मग श्यांबासि पूढें करूणि अवघे कूमर दूर्वासेंयाजवळि आले : नमस्कार केला : तयापासी बैसले : तेणें तयाची कूचेष्टा जानौणि तयासि सन्मान केला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तिचा कूमरी दूर्वासेयासी पुसिलें : ‘ जी जी : जाना पा हे पोट कवणाचें ? : अे बाइलेचा पोटी काइ होइल : ते सांघा पा : इयसि पूत्र होआवा अैसी ऊत्कंठा असे : हे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तूम्हा पूसो लाजताये ' : तेव्हळि आनीका ऋषी भणितलें : ' आरे ऊगे असा कां कूमरेंहो : तूम्ही ऊगेंचि जा : हे नोको पूसो : हे आम्ही नेनो : जा : श्रीकृष्णासि पूसा ' : मग तेही कूमरी तयासि आग्रहो घेतला : तेव्हळि दूर्वासेनि भणितलें : ' ऊगे असा गा कुमरेंहो ' : तेव्हळि तेही भणितलें : ' तूम्ही श्रीकाळज्ञानी म्हणवीता : आमचा पीता श्रीकृष्ण बाळब्रह्मचारी असें जाणता : तरि हेचि का नेना ? : सांघा इयेचा पोटी काइ आहे ? ' : इतूकेनि दूर्वासियासि कोपु चढला : मग भणितलें : इयेचा पोटी जे आहे मूसळ : तेणें तूमचा नीर्वंश होइल ' : असें आइकौणि त्ये भ्याले : पोट सोडुनि पाहाती तंवं धगधगीत लोहाचें मूसळ देखीलें मग ते अपरीतोखेंसेंसी ऊग्रेसाजवळि ( ऊग्रेसेनाजवळि ) गेले : अवघी व्यवस्था सांघीतली : मूसळ दाखवलें : ते देखौणि अवघे यादव भयचकीत जाले : मग ऊग्रसेनें श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि न पूसता ते मूसळ चूर्ण करवीलें : मग सेवकु गले : तेही ते मूसळ प्रभासेचा संगमी शीळेवरि ऊगाळीलें : तो फनू नीगाला : तो जाऊनि पानीचावनी बैसला: तेणें तीया वज्रकल्पा जालीया : मूसळासी लोहाचा खीळा होता : तो तेही पाणीयांतु सांडीला : तो मासेनि गीळीला : मग तो मासा गळी लाऊनि ढीवरें धरीला : तेणें ढीवरें मासेयाचें पोट चीरीलें : तंवं पोटाचा खीळा नीगाला : तेणें तया खीळेयाची भालि केली : मग सूबा केला : तो चांडेया भील्लासि दीधला : तंवं द्वारकेसि ऊत्पात हो लागले : ऋधीराचीया धारी मेघ वर्षले : देहा भाला भूंकेति : दूर्गावरि घारा बैसेति : सींहासनीचा ध्वजस्तंबु मोडौणि पडीला : यादवाचा मुकटी गीद बैसेति : असें देखौणि अवघे यादव भीयाले : तेव्हळि सुधर्मसभेसि बैसौनि श्रीकृष्णचक्रवर्त्ति यादवातें भणितलें : ' हे आमचा नगरी घोर ऊत्पात होताति : आमचेया कूळासि श्याप जाला असे : आता समस्तेंही बाहीरें चाला : प्रभासेचा संगमी दानपूण्ये करू : तेनें तूम्ही अवघेचि श्यापापासूनि मूंचाल ' : ते यादवी मानीलें : मग रथ संजोगू लागले : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति ऊद्धवदेवासहीत देव्हारचौकीये बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति बीजें करोती असें जानौनि दूःख करू लागले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति उद्धवातें संबोखीलें : तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्ति उद्धवासि बहूत नीरोपण केलें : मग अेरी दीवसी समस्त यादव प्रव्हानी बैसौनि थडीयेसि आले : तेथ मेल्लीकारु जाला : मग तेथ ते दानपूण्ये करू लागले : तीर्थवीध सारूणि अवघेयाची भोजनें जाली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति शंखोद्धारासि बीजें केलें : बळभद्र समूद्राचा तीरी बैसले : येरीकडे छेपन्न कोडी यादव आनि अवघे कूमर मीळाले : तेही अवघी सूरापाण केलें : मग : खेळों लागले : कौतूकें पानीचे घोडे केले : शस्त्रें केली : तीये साचोकारें जाली :



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वारुणीचेनि छंदें-छंदें खेळतखेळता मीकरा गेले: मग अेकमेकाची वर्मे बोलों लागले: कृतवर्मेनि अक्रुराचें वर्म बोलीलें: तेव्हळि अक्रुरें कृतवर्मेयातें पानीचेनि खांडें हानीतीलें: तयाचें शीर पडीलें: तेव्हळि इयांबें अक्रुराचें शीर छेदीलें: इतूकेनि द्वीध होऊनि अवघे यादव यूध्या प्रवर्त्तले: घोडे आपणया गेले: रथ आपणया गेले: हस्ती आपणया गेले: परीवार आपणया गेला: मा अवघे यादव आपणपें न संभाळीत जुंझो लागले: शीरें पडो लागली: तो हाहाकारु आइकौणि बळभद्र तेथ गेले: तंवं तैसें देखीलें: मग धावंत श्रीकृष्णचक्रवर्त्तिजवळि आले: आन भणितलें: ' आगा आगा श्रीकृष्णा: लेकूरुवें जुंझजुंझो मरतातिः तरि नीवारीसी ना कैसा ?': श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें: ' दादो पूर्वी अेथौनि स्यासि वारीलें: परि ते अेथीवें भणितलें नाइकतीचि ! : तूमचेनि नीवारीती तरि नीवारा जा ': मग बळिभद्र तयातें नीवारू गेले: तंवं ते तयाचिवरि घालीले: बळभद्रा घाये केले: मग बळिभद्रासि कोपु आला: तेव्हळि तेहीं नागरें अवघे अेकवटौणि मूसळें हानौणि अवघेचि मारीले: मग बळिभद्रीं जाऊनि श्रीकृष्णचक्रवर्त्तिपूढा तो वृत्तांतु सांघीतला: श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें: ' दादो वारू धाडीलेति की ते मारूनीचि कैसे आलेति ?': बळिभद्रीं भणितलें: ' काइ सांघो श्रीकृष्णा: नीवारू गेला तंवं मजचिवरि मारावेया ऊठीले: पाहे पां पाठीसि घाये ': भणौनि दाखवीले: तैसेचि बळभद्र नीगाले: ते समूद्राचीया तीरासि आले: तेथ तेही यूगाभ्यासें आपूला देहत्यागु केला: योगाग्णी– करूणि आपूलें देह जाळीलें: मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति रणभूमीसि बीजें केलें: तयाचें रण देखौणि थोर दूख केलें: मग तेथौनि कोशा अेकाचेनि मानें जाऊनि समूद्राचा तीरी प्रभासेचा तटी झाडाभाजी पींपळातळी शयन केलें: ॥ १०१ ॥

श्रीऊद्धवदेवा आज्ञाभंगाभावो कथन: ॥ ॥

सर्वज्ञें म्हणितलें: " बाइ: प्रभासेचा तीरी छेपणकोडी यादव आन अवघे कूमर अैसेयाचें कदन जालें: तंवं मागीलाकडौणि द्वारावतीअेहूणि प्रभासे उद्धव आले: तंवं तैसें कदन देखीलें: अेका मडीयावरि पावो देति: अेक मडी चूकवीत: मग श्रीकृष्णचक्रवर्त्तितें चोजवीत चोजवीत अशोकवनासि गेले: तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति पींपळातळी पहूड स्वीकरीला असे: उद्धव जवळि गेले: दंडवते घातली: श्रीचरणां लागले: तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि तैसी अवस्था देखीली: तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें ' उध्दवहो: माझा वीदूर न येचि ?': ' जी जी: न येचि ': मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति उध्दवातें भणितलें: ' उध्दवहो: आता तूम्ही बद्रीकाश्रमासि जावें ': ' होका जी ': श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें: " उध्दवहो: माझा वीदूर लागेहो: तूम्हासि वृंदावनी वीदूर भेटैल:

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यातें असें म्हणावें : जे 'तूमते मैत्रेयाजवळि पाठवीलें असे : तो ब्रह्मविद्या ऊपदेशील' : उध्दवहो : माझा वीदूर भेटैल तो तूमतें असें पूसैल : जे 'मज अनूज्ञा केली असे ?' : तरि तूम्ही तयासि असें सांघावें : 'हे पूसत होतें' असें म्हणावें : 'यातें आठऊनि असावें असें श्रीकृष्णचक्रवर्ति भणितलें :' उध्दवहो जा" : उध्दवीं प्रदक्षीणा केली : दंडवतें घातली : श्रीचरणां लागले : मग उध्दव नीगाले : दोनिच्यारि पाऊलें गेले : आनि परतले : श्रीकृष्णचक्रवर्त्तितें अवलोकीत ऊभे ठेले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'उद्धवहो जा' : पैलठावोवेर्‍ही गेले : आन न वचवेचि : मागौते आले : मागौते पाठवीले : मागौते पैलठावोवेर्‍ही गेले : आन न वचवेचि : मागौते आले : असी त्रीशूद्ध जाली : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'उद्धवहो : आता अेथौनि जा ना तरि अेथीची आन' : आन तंसेचि नीगाले : पाऊलें दाहा-पाच गले : आन न वचवे : मागौते आले : दु:ख करूं लागले : मूर्छा आली : भूमीवरि पडीले : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति कृपादृष्टी अवलोकूनि दूखवीश्रांति केली : संजीवन जाले : असें उध्दवासि श्रीकृष्णचक्रवर्त्तितें सांडौनि न वचवेचि : भणौनि पून:पूना परतौनि अेति : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति म्हणीया भणौनि पाठवीले : उद्धवीं प्रदक्षेणा केली : दंडवतें घातली : श्रीचरणां लागले : मग उध्दवं नीगाले : कोश अेक गेले : आन न वचवे : मागौते आले" : । :

महदाइसी पुसिलें : "जी जी : उध्दवं गेले की नाही ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : गेले" : "जी जी : तयासि कैसें जाव [व*]लें ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : उध्दवातें कृपादृष्टी अवलोकूणि अपरोक्ष संचरलें : मग सर्वत्र सन्नीधान देखो लागले : उध्दवां अपरोक्ष जालें : भणौनि वाचले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति उद्धवदेवासि अपरोक्ष संचरलें तेणें देखतेंचि होते †" : । १ । :

महदाइसी पुसिलें : "जी जी : उद्धवासि आज्ञाभंगाचा अवीधि वव्हेचि ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्तिची उद्धव आज्ञाभंग करूणि आले : तरि तयासि काइ अवीधि जाला : मा ईश्वरीची आज्ञा ईश्वरेचि कारणें भंगीली" :

महदाइसी पुसिलें : "जी जी : उद्धवं कवणीयेकडे गेले ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति उद्धवासि अपरोक्ष संचरीले : मग ते श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि आपणयाज[वळि*] देखतें † : भणौनि श्रीकृष्णचक्र-

---

† 'देखतेंचि होते' असे आधी लिहिलेले होते. पण नंतर 'चि होते' ही अक्षरे खोडण्यात आली आहेत (पोथी-पृ. २०५).

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वर्त्तीसि सांडौनि चालीले : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति बीजें केलें : नंतरें उद्धवं वृंदावनासि आले : तंवं तेथ वृंदावनीची झाडें वृक्ष ऊन्मळले असति : ते देखौणि भणितलें : ‘सर्वज्ञ बीजें केलें भणौनि येही वाळली : धन्य धन्य इये झाडें : ये जीती काइ : ये ऊद्धव मा ऊरती ’ : आन बहूत दूःख केलें : सामोरे नीगाले : वृंदावनी उद्धवं जंवं दूःख करीति तंवं सूदामा– वीदूरदेव भेटले : तेही उद्धवासि व्यवस्था पुसिलें . तेही सांघीतली : ते आइकौणि दोघ तेथ पडीले : सूदामेयाचें देह वीसर्जलें : मग तेथ गोष्टी करीता ऊभयासी सात अव्होरात्रें गेली : उद्धव श्रीकृष्णचक्रवर्त्तीचा महीमा नीरोपीत : तो वीदूरदेव आइकेति : आन तेवीचि दोघें दूःख करीति : असें वीदूरोद्धवा संवाद जालेंयानंतरें वीदूरें भणितलें : ‘ हा हो उद्धवंहो : सर्वज्ञ काही माझी आठवन केली ? ’ : या ऊत्तरावरि ऊद्धवदेवी बहूत दूःख केलें : मग भणितलें : ‘‘ वीदूदेवरहो : मातें सर्वज्ञ असें भणितलें : ‘ माझा वीदूर तूम्हालागे हो ’’ : भणौनि अवघा वृत्तांत सांघीतला : उद्धवीं भणितलें : ‘ वीदूरदेवहो : तूम्हासि सर्वज्ञं मैत्रयाजवळि पाठवीलें असे ’ : मग उद्धवं नीगाले : ते बद्रीकाश्रमासि गेले : मग वीदूरदेव मैत्रेयाजवळि गेले : अवघी व्यवस्था सांघीतली : मग मैत्रनि वीदूरदेवासि ब्रह्मवीद्या नीरोपीली : मग वीदूरदेव बद्रीकाश्रमा उद्धवांजवळि गेले ’’ :।:

म्हदाइसी पुसिलें : “ जी जी : मैत्रेया ब्रह्मवीद्या काइ जाने ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : मैत्रयासी पूर्वी श्रीकृष्णचक्रवर्त्ति ब्रह्मवीद्या नीरोपीली होती : भणौनि तो ब्रह्मवीद्या जाने : बाइ :।: मैत्रेया तो देहवीद्यावंत ” : ॥ १०२ ॥

अर्जूनदर्शनप्रसंगें राज्यादीव्यवस्था–कथन :॥ ॥

सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : उद्धवं गेलेंयानंतरें हस्तीनापूरीहूनि श्रीकृष्ण-चक्रवर्त्तिसि भेटावेया अर्जून नीगाले : नीगता यूधीष्ठीरें पुसिलें : ‘ आरे बा अर्जूना : सर्वज्ञ तूज क्षेम मागती तरि क्षेम नको देवो : क्षेम झनें देसीहो ’ : ‘ हो कां ’ : भणौनि नीगाले : ते प्रभासेसि आले : तंवं तेथ यादवाचें रण देखीलें : आन दूःख करू लागलें : आन श्रीकृष्णचक्रवर्त्ततें चोजवीत चोजवीत तया पींपळातळी गेले : अर्जूनी आलींगौणि दंडवत केले : परि साऊमा न ये : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति भणितलें : ‘ कूंती नीकेनि असे ?’ : ‘ जी जी : आता काइसें नीकेपण ! ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनातें अेता देखीलें : आन दूःख स्वीकरीलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ आरे बा अर्जूना : अेय खेवं दे ’ : अर्जूनी भणितलें : ‘ रायाची आज्ञा नाही ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ अर्जूना : तू [मा*]झा बाळमैत्र कीं गा : क्षेम नेदीसी तरि हात तऱ्ही दे ’ : ‘ ना जी : मज रायें वारीलें असे ’ :

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मागौतें भणितलें : 'अर्जूना : तू माझा प्राणसखा कीं गा : हात कां नेदीसी ?' : 'ना जी : वारीलें असे' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'आरे बा अर्जूना : अैसा कैसा नीष्ठुर जालासि ? : हात नेदीसी तरि धनूष्याची कोटी तऱ्ही दे का' : अर्जून दुःख करीति : परि साऊमे न व्हेति : अर्जूनी कोटी दीधली : ते श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति वक्षस्थळेंसी धरीली : इतूकेनि श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनाचा शक्ती हरीली : धनूष्य ऊचले इतूकी शक्ती दीधली : जरि अर्जून धनूष्याची कोटी नेदीता तरि भीलाचेनि गोपीकाहरण न व्हते : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'बा अर्जूना : युधीष्ठीरु भीमसेन नकूळ साहादेव कूंतीदेवी द्रौपदी ये समस्तें नीकेनि असति ?' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : "अर्जूनहो रायासि अैसा नीरोप सांघावा : 'परीक्षीतीसी हस्तीनापूरीचें राज्य देयावें : आन वज्रासी द्वारावतीयेचें राज्य देयावें' : आता कडेचा सातवा दीवसी समूद्र लोटैल : हे अवघी द्वारका बूडैल : आता पृथवीचे राये ऊठावती : तूमचें केलें काही न चले हो : जीये दीवसी अेथौनि हस्तीनापूरासि जाल तीये दीवसी सकळ व्यवस्था करूणि नीगावे : तूम्ही ऊत्तरापंथें हीमांचळासि जावें : अेथीचें स्मरण करावें : तेथ हीमेंकरूणि तूमची देह वीसर्जती : मग तूम्हा अवघेयासि पूणःसंबंध दीजैल" : मग अर्जूनासि थोर दूःख जालें : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्ति अर्जूनासि संबोखीलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनातें भणितलें : 'अर्जूनहो : तूम्ही द्वारकेंसि जावें : अवघे लोक बाहीरि काढावे' : मग अर्जून दंडवतें करूणि द्वारकेसि नीगाले" : ॥ १०३ ॥

श्रीकृष्णपूरत्यागप्रसंगें भीळापूतनेंफळ–कथन : ॥ ॥

एकुदी : महदाइसी पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्त्ति कैसा पूरत्यागु केला ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : कर्पूरकाजळीवत् श्रीकृष्णचक्रवर्त्ति पूरत्याग केला" : । १ । : महदाइसी भणितलें : "जी जी : कव्हणें नीमीत्तें केला ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति प्रभासातटांकी अशोकवनी पींपळा-तळी भूमीशयन केलें : सर्व अळंकार परीपूर्णप्रवर्तेचि होते : तवं रातोत्पळाअैसी श्रीचरण चांडेनि भील्लें ससंयाचा कान म्हणौनि वींधीलें : हात नीवाला म्हणौनि साऊमा आला : तंवं तेणें श्रीकृष्णचक्रवर्त्तितें शंखचक्रगदापद्म अेहीयूक्त देखीलें : भालि श्रीचरणी लागली देखीली : आन देखौणि भीयाला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'ना भी ना भी हो : हे अेथौनि अगीकरीलें' : मग तो भील्ल श्रीचरणावरि माथा ठेऊनि दुःख करू लागला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तो तेणेंचि देहे स्वर्गासि पाठवीला : अैसी श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि दशा पातली : तंवं तेथ दारुक आला : ते देखौणि तेणें थोर दूःख केलें : मग भणितलें : 'जी जी : दीव्ये


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आयूध्येसी रथ अदृश्य जाला : आता मज काइ आज्ञा ? ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ तुम्ही द्वारकेसि जाऊनि अवघेयापुढा सांघावें . जे ‘ अेणें बीजें केलें ’ : आन तुंवा अेथीचें नाम आठवावें ’ : इतुकेंनि तो द्वारकेसि आला : अेरीकडे श्रीकृष्णचक्रवर्त्तिजवळि ब्रह्मादीक देव आले : तेही भणितलें : ‘ आता बीजें कीजो ’ : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति योगाभ्यासें ते पुर तेजीलें : योगाग्णीकरूणि तया पुराचें भस्म जालें : अेथा कापूरकाजळी ” :।:

मइदाइसी पुसिलें : “ जी जी : तया भील्लासि काइ जालें जी ? ” सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : भील्लासि श्रीकृष्णचक्रवर्त्तिचा ठाइ असंत क्रीया घडली : पूतनेसि क्रीया न घडेचि ” :।: सर्वज्ञें म्हणितलें : ‘ ‘ बाइ . भील्ल वोखटेनि मनोधर्में नाही आला परि क्रीयाप्रवेशन जाली : भणौनि नीत्यनरका गेला ” : ।१। रामे :।: असंत फळा गेला :।१। पूतना वोखटेनि मनोधर्में आली : परि क्रीयाप्रवेशन नव्हेचि : भणौनि नीत्यनरका न वचेचि : लीळावशें वैकूंठभूवा गेली :।१।: श्रीकृष्णअवतारी जेही वैर केलें तयासी वधूणि लीळावशें श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति चतूर्वीधा मूक्ती दीधलीया ” ।१।: मइदाइसी पुसिलें : “ जी जी : वैरभावें पूतना आली तीयेसि अेसनी गति : तरि येशोदेसि कवण गति ? ” :।: सर्वज्ञें म्हणितलें : ‘ बाइ : जेचि गति यशोदे तेचि पूतने ” :।१।: मइदाइसी पुसिलें : “ जी जी : संत असंत फळ काइसेनि होये ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : क्रीयाप्रवेशनी फळ ” :।१।। : ।।१०४।।

## अर्जूनदेवनीवेदीत द्वारावतीव्यवस्था : श्रीकृष्णपूरत्यागश्रवणे कूंतीये देहत्याग— कथन : ।। ।।

मइदाइसी पुसिलें : “ जी जी : अर्जून द्वारावतीये गेले : मग काइ वर्त्तलें ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : अर्जून द्वारावतीयेसि गेले : तेही अव-घेया लोकातें अंतःपूरातें बाहीरि काढीलें : तंवं तेथ द्वारुक आला : तेणें समस्ताजवळि श्रीकृष्णचक्रवर्त्तिची व्यवस्था सांघीतली : ते आइकोणि ऊग्रसेनु देवकी रोहीनी वसूदेव याची दुःखें करीता देह गेली : साता पट्टमहीषी सोळा-सहस्र अंतःपूरी अग्णीप्रवेश केले : मग यादवाचा अंतपूरी कूमराचा अंतःपूरी अग्णीप्रवेश केले : सोइरेया— धाइरेयाचा अंतःपूरी अग्णीप्रवेश केले : मग गोपीका अर्जूनाजवळि आलीया : अर्जूनाते म्हणो लागलीया : ‘ बा अर्जूना आम्हासि सवें ने का ’ : मग अर्जूनी तीया सवें घेतलीया : सवें द्वारकेचे लोक नीगाले : अर्जूनी आधी गोपीका उत्तरलीया : आणि लोक ऊत्तरावे असति तंवं समूद्राचा हेलावा आला : तेणें ते लोक बूडाले : अर्जून प्रभासेचीया तीरासि आले :

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अवघेया यादवाचा संस्कारु केला : तंवं भील्ल चालीले : तेही अवघा नगरलोक नागीवला : गोपीकातें हरू लागले : तेऱ्हळि गोपीकी अर्जूनाते भणितलें : 'बा अर्जूना : आम्हासि हे भील्ल नेताति की ! ' : मग अर्जून जंवं गांजीवा हात घालीति तंवं गांजीव न चढेचि ! : मंत्र म्हणौनि ऊच्चारीति तंवं ते अवघें नीर्फळ होअे : तया भील्लाचें अर्जूनास्तवं काही नव्हवेचि : मग अर्जून आपूलेंया मुकुटाभवतें धनूष्य फीरऊ भवंडु लागले : मग अर्जूनाचीया धनूष्याचीये कोटीखाली जेतुकीया होतीया तेतूकीया वाचीलीया : अेरी भील्ली हरीलीया : मग अर्जून नीगाले : हारीपारी पावो न पडे : मग अर्जून तया गोपीकासि आन वज्रासी हस्तीनापूरासि घेऊनि गेले " :। :

महदाइसी पुसिलें : "जी जी : गोपीकासि अैसें का जालें ? " सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : तेही ईश्वरू वीषयसंबंधें भावीला : भणौनि त्याते पद पावलीया : परि तयाची वीषयवासना न नीवर्त्तेचि : अन्येत्र संसर्ग करीतेचि असतिः भणौनि भील्ली हरीलीया : बाइ :। : जयाचा वेध तयाची प्राप्ति : " :। १ । : महदाइसी भणितलें : "जी जी : पौराणीक अैसें बोलताति जे गोपीकासि नरक जाले हे साच जी ? ' : सर्वज्ञें भणितलें : "बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्तिचें अर्द्धांग पावौणि गोपीकी भील्लाची सातसात लेकुरुवें वीजेति : यापरते याहूनि आनीक काइ तया नरक असति ? " :। १ ।: तैसें आता तूम्ही ओरु ( ? ) जानौणि अमेध्यतूल्य वीखो सेवीजे : यापरते आनीक काइ नरक असति बाइ ? " :। १ । : महदाइसी भणितलें : "जी जी : गोपीकासि आनीक नरक नाहीति तरि तेचि नरक कैसे जी ? " :।: सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : गोपीकी श्रीकृष्ण-चक्रवर्त्तितें आहाळीबाहाळी वीषयेभागे भोगीलें : जया गोपीका माचयाची नीद्रा होती ते तनाचीये सेजेची नीद्रा : माचीयेचें नीजनें : काष्टाचेया उबाळेयाचा ऊजीयेड : गोनटें नेसनें : कोदोची वरो : तया हेचि नरक की : बाइ : मा श्रीकृष्णचक्रवर्त्तिची आज्ञा भंगूणि राहीलीया : भणौनि अैसें तया जालें " :। :

महदाइसी पुसिलें : "जी जी : अर्जून आपूलीया नगरासि गेले : मग काइ जालें जी ? " : सर्वज्ञें म्हणितलें : 'बाइ : अर्जूनदेवी यूधीष्ठीराजवळि जाऊनि अवघी व्यवस्या सांघीतली : आनि अर्जूनी भणितलें : 'राजेहो : आजि सर्वज्ञं सांडीलो' : भणौनि धाये मोकलूणि रडो लागले : तेणें यूधीष्ठीरासि थोर दूख जालें : मग यूधीष्ठीरी अर्जूनातें भणितलें : 'बा अर्जूना : सर्वज्ञ बीजें केलें : मा आम्हासि काइ आज्ञा केली ? : अर्जूनी भणितलें : "सर्वज्ञ अैसें भणितले : 'तूम्ही पाचही द्रौपदीयेसहीत हीमांचळासी जा : मग तूम्हासि पूणःसंबंध दीजैल :


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपुला राजी परीक्षती बैंसवा : द्वारावतीयेचें राज्य वज्रासि द्यावें : आनि आजीचि नीगावें ’ : अैसी आज्ञा केली असे ’ : मग अर्जून कूंतीचीया राऊळासि गेले : तंवं कूंती दारवठेसी वाट पाहातूचि होती : तंवं अर्जून अंता देखीले : कूंतीया भणितलें : ‘ बा तूझा सारथी काइ ? ’ : अर्जूनदेवी भणितलें : ‘ काइ पूसतासि ? : तेणें आमतें सांडीले की वो ’ : कूंतीयेपूढा सांघीतलें : ‘ माते : सर्वज्ञ आमतें सांडीलें ’ : कूंतीया भणितलें : ‘ सत्य ’ ? : अर्जूनी भणितलें : ‘ सत्य ’ ! : इतूकेनि कवाडेंसी ऊभीयाचि देह त्येजीलें : तैसेंचि तीयेचें ऊभीयाचि देह गेलें : देखीलें कीं : बाइ : । : श्रीकृष्णचक्रवर्त्तिचेनि वीयोगें तेतूकेंया पाचा पोरीयाभीतरि कोण्हास्तव काही नव्हेंवेंचि : अेकलीया कूंतीया आइकतखेवोचि देह त्येजीलें ” : । १ ॥ : ॥ १०५ ॥

वज्रपरीक्षीती राज्यप्रदान– कथन : ॥ ॥

महदाइसी पुसिलें : “ जी जी : कूंतीया देहत्याग केलेंयानंतरें पांडवी काइ केलें जी ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : द्वापराचा नीगावा आन कळीचा रीगावा : यूधीष्ठीर सात अव्होरात्रें राज्याची व्यवस्था करावेया राहीला : जीये दीवसी अर्जून आले तीये दीवसी कूंतीया देहत्याग केला : तीयेचि दीवसी यूधीष्ठीरें भीमसेनातें भणितलें : ‘ तूम्ही चौघें द्रापदीयेसहीत हीमांचळासि जा : केदारी माझी वाट पाहा : तंवं मी राज्याची व्यवस्था करूणि आठवा दीवसी तूम्हाजवळि अेइन : आम्हासि सर्वज्ञांची आज्ञा असे : जे ‘ हीमांचळासि जावें ’ : तरि तूम्ही चालते होआवा ’ : मग ते तीयेचि दीवसी नीगाले : यूधीष्ठीरें ऊग्रेसेनाचा राजी वज्र बैसवीला : आनि आपूला राजी परीक्षीतू बैसवीला : अैसें यूधीष्ठीरासि राज्याची व्यवस्था करीता कळीयूगी सात दिवस लागले : तंवं यूधीष्ठीर तेथीची अन्नोदकें न सेवीचि : तेथीचा धर्म तीर्थक्षेत्र वर्त्तदान न करीचि : मग : आठवा दिवसी यूधीष्ठीर नीगाला : तेव्हळि परीक्षीती आन गोपीका आन वज्र धाये मोकलूणि रडो लागली : अवघेया नगरांत आकांत थोर वर्त्तला : यूधीष्ठीराचेया दूःखा पारावारु नाही : मग यूधीष्ठीर नीगाला : तो हीमांचळासि आला : तेथ केदारी पाचहीजनें भेटली ” : ॥ १०६ ॥

पांडवादेहत्याग–कथन : ॥ ॥

महदाइसी पुसिलें : “ जी जी : [ पाच* ] ही पांडवाचा कैसा देहत्यागु जाला ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : पाचही पांडव आन साहावी द्रौपदी अैसी नीगाली : पेना जाता बहूतें अरीष्टें ऊपजली : अैसी हीमांचळी प्रवेशली :



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तंवं हीमेंकरूणि द्रौपदी पडीली : यूधीष्ठीरें भणितलें : 'अर्जूना : द्रौपदी पडीली की' : तेव्हळि अर्जून द्रौपदीयेजवळि आले : द्रौपदीया अर्जूनाते अंता देखीलें : ते आपलवती भणौनि तीया तोंड झांकीलें : अर्जूनी भणितलें : 'द्रौपदीये तूम्ही तोंड कां झांकीलें ? : मातें धर्में पाठवीलें असे : आनि मी धर्मेंचि आला असे :' आनि द्रौपदीया तोंड ऊघडीलें : द्रौपदीया भणितलें : 'हो का तूम्ही धर्मेंचि आलेति तरि देवधर्म वीसरो नको हो' : तंवं अर्जूनी भणितलें : 'मी न वीसरे : परि तूम्हीही नको वीसरो' : इतूकेनि द्रौपदीयेचे कंठस्थ प्राण जालें : 'श्रीकृष्ण' 'श्रीकृष्ण' अैसें पाच वेळ भणितलें : आनि द्रौपदीचा प्राण गेला : तंसाचि अर्जून नीगाला : तो यूधीष्ठीराजवळि आला : यूधीष्ठीराजवळि सांघीतलें : 'जी जी : द्रौपदीचा प्राण गेला' : मग यूधीष्ठीरें द्रौपदीचे अगूण काढीले : तेणें अर्जूनाचे महोपाश निरसले: अैसा पंथ क्रमीता अर्जून हींवें पडीले : भीमसेनें भणितलें : 'राया : अर्जून पडीला' : यूधीष्ठीर परतौनि वास पाहेचि : नावेक पूढें गेले : तंवं नकूळ साहादेव पडीले : भीमसेनें भणितलें : 'राया नकूळ साहादेव पडीले' : परि यूधीष्ठीर परौनि ( परतौनि ) वास न पाहेचि : मग दोघें नीगाले : तंवं पूढा भीमसेनुं पडीला : पडतपडता भीमसेनें भणितलें : 'राजेहो : आमची गति अैसी जाली : आता आमचा नमस्कार घेया' : आनि 'श्रीकृष्ण' भणौनि प्राण दीधला : यूधीष्ठीर मोह झळंबौणि भीमसेनाजवळि आला : मग भीमसेनाचें शव पाठीसी बांधौनि चालीला : तंव आशीरीरी वाचा जाली : 'आरे हे शव सांडि सांडि : काइसेंया नेतासि' : इतूकेनि ते शव टाकीलें : मग साऊमा नीगाला : हीमांचळ अतीक्रमला : तंवं यूधीष्ठीरासि कव्हणीअेकु भेटला : तेणें यूधीष्ठीराचा माथा हात ठेवीला : इतूकेनि तयाचें दीव्य देह जालें" : ॥ १०७ ॥

यूधीष्ठीरा नीरयेदर्शन - कथन : ॥ ॥

सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : यूधीष्ठीर राज्याची व्यवस्था करावयाकारणें सात अव्होरात्रें कळीयूगी राहीला : तेथीची अन्नोदकें न सेवीताचि : परि तयासि नीरयाचें दर्शन केलेंचि" :। : महादाइसी पुसिलें : "जी जी : यूधीष्ठीरासि नीरयाचें दर्शन कां केलें ?" :। : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : कळीयूगी जन्ममात्रें चौकडीपर्यंत नरक" :। १ । : महदाइसी भणितलें : "जी जी : यूधीष्ठीरासि कैं नीरयाचें दर्शन केलें ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : धर्म साऊमा नीगाला : तंवं वीमान आलें : मग मंगळमहोत्साये बहूत समारंभें आरूढ होऊनि स्वर्गासि नीगाला : अैसें जाता येकं मार्गु स्वर्गासि जाये : अेकु मार्ग सयमीनीसि जाअे : वीमानचाळकी भणितलें : 'आरे सयमीनीचेनि मार्गें चाला' : मग ते नीगाले :



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यूधीष्ठीर नीरयाचीया वाटा चालीला : तंवं तेथ तेणें अन्येकें परीची मृतयातना देखीली : चौकडीयेचे नीरये देखीले : आनि खेदातें पावला : यूधीष्ठीरें त्यातें भणितलें : 'हां गा या वाटा मातें का आनीलें ? ' : तेही भणितलें : 'तू आज्ञा भंगुणि कळीयूगी राहीलासि भणौनि ' : यूधीष्ठीरें भणितलें : 'मीया तरि कळीयूगीची अन्नोदकें नाही सेवीलीति ' : 'तरि कळीयूगीचा वारा तऱ्ही लागलाचि की : भणौनि तूज नरकांचें दर्शन केलें ' : मग यूधीष्ठीरु साऊमा जाताअे तंवं कूंभीपाक देखीले : यूधीष्ठीरें भणितलें : 'अेथ आमचे बंद्धू असति : ते दाखवा पा ' : मग तेही ते झांकणी ऊघडीली : तंवं दूर्योधनादीक वरि आले होते : तंवं कौरव नरकी पचीजताति : तंवं अेकी भणितलें : 'हारे धर्माचें मूख तऱ्ही पाहो ' : तंवं यमदूती भणितलें : 'दूर्योधना तूझा बंद्धू आला असे : तया अेऊतें पाहे ' : दर्योधनें भणितलें : 'वैरीयाचें मूख काइ पाहो ' : भणौनि बूडी दीधली : जेही यूधीष्ठीराकडे पाहीलें तयासि ऊसासा जाला : ते धर्में हात देऊनि काढीले : तेही मार्गातें झांकण ठेवीलें : मग यूधीष्ठीर तेथौनि नीगाला : " ॥ १०८ ॥

वज्रप्रतीष्ठा – कथन : ॥ ॥

एकु दी : महदाइसी पुसिलें : " जी जी : बाहीरि द्वारावतीयेची कोणें प्रतीष्ठा केली ? " : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : परीक्षीती काळधर्मा गेलेंयानंतरें वज्र राज्यभ्रष्ट जाला : मग जन्मेजयमूख्य कव्हणीअेक कळीयूगीचे राये मीळाले : तेही श्रीकृष्णचक्रवर्त्तिचा पणतू भणौनि जाणीतीला : मग तेही अवघा मीळौणि आपूलालीया शक्तीसारीखें चातूरंग सैन्य दीधलें : सप्तांगराज्यसयूक्त करूणि वज्रासि राज्यपट्टाभीसेख भरीला : मग तेणें समूद्राचा काठी आपूलीया परी अेकि द्वारावती वसवीली : श्रीकृष्णचक्रवर्त्ति रूक्मीणीदेवीचेनि भावें पाषाणाचीया प्रतीमा करूणि प्रतीष्ठा केली : तैंपासौणि लोकु तेथ यात्रेसि जात असे " : ॥ १०९ ॥ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

*[ वाइंदेशकरपाठाच्या ' श्रीकृष्णचरित्रा 'ची ' अक्रूरस्वामी-द्रोहीकथनी सत्राजीतवध-कथन ' या लीळेपासून पुढली संहिता संपूर्ण ]*

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. शरद पाटील

# स्त्रीराज्य : ६ : (पूर्वार्ध)

राजसूय यज्ञात ज्याचा राजन्पदी अभिषेक होई त्याला अभिसिंचनापूर्वी ब्रह्मन्पदाची दीक्षा दिली जात असे. इतरही प्रत्येक यज्ञात यजमानाला ब्रह्मन् म्हणून दीक्षित करावे लागत असे. म्हणजे त्याला ब्रह्मन् म्हणून आपला पुनर्जन्म होण्याची 'नक्कल' वा 'अभिनय' करावा लागत असे, हा कुमारस्वामींचा निष्कर्ष अचूक आहे–

'तसेच हे लक्षात ठेवले पाहिजे की राजसूय हा "समानधर्मी" विधी आहे आणि प्रत्येक यजमानाचा यज्ञातून, ब्रह्मातून, पुनर्जन्म होत असल्याने तो ब्रह्मन् (ब्राह्मण, ब्रह्मपासून बनलेले पितृनाम) म्हणून जन्माला येतो; दीक्षिताला म्हणूनच ब्रह्मन् असे संबोधले जाते, मग त्याचा वर्ण कोणताही असो (शतपथ ब्राह्मण, ३. २. १. ४० ) : "यजमान हा ब्रह्म आहे, दीक्षिताचा यज्ञातून पुनर्जन्म होतो ... तो ब्राह्मणत्वाला प्राप्त होतो" (ब्राह्मणताम् उपैति, ऐतरेय ब्राह्मण, ७. २२–२३ ).'[१]

ब्रह्मन् म्हणून दीक्षित झालेल्या नियुक्त राजाला म्हणूनच सर्व प्रमुख ऋत्विज् तैत्तिरीय संहितेत ( १. ८. १६ ) ब्रह्मन् म्हणून हाक मारतात–

'... ऋत्विज् व रत्निन्* ... मग राजाला अभिवादन करण्यासाठी त्याच्याभोवती वर्तुळाकार बसतात, अध्वर्यु पूर्वेला बसतो, ब्रह्मन् दक्षिणेला, होतृ पश्चिमेला व उद्गातृ उत्तरेला. राजा मग अध्वर्यूला हाक मारतो, 'ब्रह्मन्, (ओम्) !' तो ऋत्विज उत्तरतो, 'राजा, तू ब्रह्मन् आहेस, तू सत्यप्रेरणेचा सवितृ आहेस.' तशाच प्रकारे राजा ब्रह्मन्ला हाक मारतो, 'ब्रह्मन् !' व तो ऋत्विज् उत्तरतो, 'राजा, तू ब्रह्मन् आहेस, त सत्य शक्तीचा इंद्र आहेस !' मग होतृला, जो उत्तरतो, '... तू परम मैत्रीचा मित्र आहेस !' – नंतर उद्गातृ : '... तू सत्यविश्वनियमांचा वरुण आहेस !' ..[२]

आश्चर्यकारक तर खरेच, पण तो ब्रह्मन्पदाला प्राप्त होताच ते पद त्याला सोडून जाते–

'... हे उघड आहे की राजत्व सोडून ब्रह्मन् झाल्यानंतर राजा ब्राह्मणत्वाचाही त्याग करतो : "जेव्हा तो ( उपदिष्ट विधीच्या ) अंती येतो, तेव्हा

---

* यांना राजकर्तेही म्हणतात.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तो अग्नि, वायु व आदित्य या ( वैश्विक पुरोहितांना ), ' आता मी तो आहे जो मी आहे, ' या शब्दांनी साक्ष ठेवून क्षत्रियत्वात प्रविष्ट होतो ( ऐतरेय ब्राह्मण, ७.२२ ) ... '[३]

ब्रह्मत्व त्याला का सोडून जाते ? याचे उत्तर विधीतच शोधले पाहिजे. मुख्य ऋत्विजांकडून ब्रह्मन् म्हणून उद्घोषित झाल्यानंतर राजा लगेच स्फ्यने ( लाकडी खड्ग ) जमिनीवर चौपाटाची आकृती काढी व त्यावर पाच फासे ठेवी.[४] अगोदर खुलासा केल्याप्रमाणे हा राष्ट्र वा गणभूमीचे, आधी ज्ञातींच्या हिश्श्यात व नंतर कुळांच्या हिश्श्यात, वाटप करायचा विधी होता. हेच ते कार्य आहे की ज्यातून भारतात राजपदाची उत्पत्ती झाली, आणि हे राजत्वच राजाच्या ब्रह्मत्वाचा अंत करी. ही दोन्ही कार्ये परस्परवर्जक होती.

हे स्फ्य म्हटले जाणारे लाकडी खड्ग आहे तरी काय ? भाताचे गुणगान गाणाऱ्या ११.३ या अथर्ववेदीय सूक्तावरचे आध्यात्मिक आवरण हटवताच ते भात अस्तित्वात आणणाऱ्या शेतीच्या व पाकशास्त्राच्या क्रियांचे वर्णन करणारे सूक्त आहे असे दिसेल. नववी ऋचा स्फ्यचे काम सांगते—

' ९. खळे हे [ त्याचे ] पात्र आहे, दोन ( स्फ्य ) [ त्याचे ] खांदे, दोन दांडे ( ईषा ) [ त्याचे ] कणे ( अनूख्या ).'[५]

एम्. एम् कुंटे स्फ्यच्या मूळ प्रयोजनाचा उलगडा करतात—

'..... सर्व यज्ञांमध्ये वापरल्या जाणाऱ्या खड्गाला कर्मकांडी वाङ्मयात स्फ्य म्हणतात. स्फ्य–खड्ग हे वृद्धीचे साधन असल्यामुळे त्याचा संबंध स्फै या धातूशी जोडला पाहिजे. जरी यज्ञीय स्फ्यला खड्गाचा आकार असला, तरी त्याचा खणण्यासाठीही उपयोग होतो ... '[६]

स्फ्यचा मूळ उपयोग पाभरीच्या कुसल्यांसारखा होता. ती टोक केलेली काठी होती व ते टोक बऱ्याच वेळा आगीत कठीण केलेले असे. जगभर स्त्रियांनी अशा हत्यारांनी शेती सुरू केली. पुरुष मागासलेल्या हत्यारांनी व आगीने जमिनीचा तुकडा साफसूफ करीत आणि स्त्रिया पेरणी, निंदणी व कापणीची सर्व कामे करीत. फ्रेझर प्रत्येक खंडातल्या शेती व शिकारीवर जगणाऱ्या आदिवासी जमातींची उदाहरणे देतो, ज्यातून आफ्रिकेच्या झुलू व बाटोंगांची उदाहरणे येथे उद्धृत केली आहेत—

'..... झुलूत, " जेव्हा जमिनीचा एखादा तुकडा लागवडीसाठी निवडला जातो, तेव्हा तो साफसूफ करायची जबाबदारी पुरुषांवर पडते .... जमीन जर झाडाझुडपांनी जास्त भरलेली असेल तर काम जिकिरीचे होते;



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारण त्यांची कुऱ्हाड छोटी असते व एखादे मोठे झाड तोडायचे असले तर ते त्याच्या केवळ फांद्याच ढाळू शकतात. खोड काढायचे झाल्यास ते आगीचा उपयोग करतात. म्हणून झाडवन जमिनीच्या उत्कृष्टतेची त्यांना जाणीव असली, तरीही ते अशा जमिनी कटाक्षाने टाळतात याबद्दल वाचकांना आश्चर्य वाटणार नाही.... खणणी, लावणी व निंदणीचे सर्व काबाडकष्ट त्यांना (स्त्रियांना) करावे लागतात: .... या ओबडधोबड व अवजड हत्याराने (स्पयने) स्त्री तिचे वाडगे खणते, लावते व निंदते...." अशाच प्रकारे डेलागोआ आखाताच्या बारोंगांमध्ये, "जेव्हा पाऊस पडायला सुरवात होते, ... तेव्हा ते पेरायची घाई करतात. शेताची मालकीण हातात स्पय घेऊन जवळजवळ पावले टाकीत चालते; प्रत्येक पावलाला ती चांगल्या फोडलेल्या ढेकळातून स्पय वर काढते व पाडलेल्या भोकात मक्याचे तीन ते चार दाणे टाकून त्यांच्यावर (पायाने) माती लोटते. कस जाईपर्यंत सतत तीन ते चार वर्षे तेच शेत पेरतात. खताने जमिनीचे पोत समृद्ध करायचा विचार तर त्यांच्या मनालाही शिवत नाही......"[१७]

भारतीय आदिवासी अशाच प्रकारे जमिनी कसीत. 'शेती हा केवळ स्त्रियांचाच प्रांत असल्याच्या कारणमीमांसेदाखल फ्रेझर इंडियन द्वीपसमूहातले एक वैशिष्ट्यपूर्ण उदाहरण देऊन जगभरच्या आद्य कृषकांची मनोवृत्ती साररूपाने मांडतो–

'... ...ओरिनोको इंडियन आपल्या पाषाणपरशूंनी जंगलातली झाडे तोडून, पडलेला लाकुडफाटा जाळून' आगीत भाजून कठीण केलेल्या लाकडी हत्यारांनी जमीन फोडून लागवडीसाठी जंगल साफसूफ करायचे अपार काबाडकष्ट करीत, पण मका पेरायची व कंदमुळे लावायची कामगिरी केवळ स्त्रियाच पार पाडीत या कष्टसाध्य कामात बायकांना मदत न करण्याबद्दल त्यांच्या नवऱ्यांना जेव्हा स्पॅनिश मिशनऱ्यांनी दोष दिला, तेव्हा त्यांना उत्तर मिळाले की, बीजधारणेचे व अपत्यप्रसूतीचे काम स्त्रियाच जाणीत असल्यामुळे पुरुषांऐवजी त्यांनी लावलेल्या बी व कंदमुळांचे भरमसाट पीक येते.'[१]

ज्याप्रमाणे चौपट हा गणभूमीच्या विभाजनाचे वा वाटपाचे आदर्शीकरण होता, त्याचप्रमाणे लाकडी खड्ग हा ओबड धोबड लाकडी स्पयचे ओळख पटण्यापलिकडे गेलेले रूप होता. *

---

* दुर्गा वा कालीच्या हातातील खड्ग मुळातले स्पयच !



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाजसनयि संहितावर्णित राजसूय यज्ञाने-'राष्ट्र गणभमी कशी अस्तित्वात आली,' याची स्मृती सुरक्षित ठेवलली आहे. १०. १–४ या मंत्रांनी राजा सरस्वती व इतर नद्यांच्या पाण्याचा स्वीकार करी. पहिला मंत्र म्हणतो की सरस्वतीचे पाणी गोड, अन्नदा व नृपोत्पादक आहे. मंत्र २-४ या पाण्याला पुनःपुन्हा 'राष्ट्रदा' म्हणून आवाहन करतात दुसरा मंत्र म्हणतो की यज्ञसत्रात येणारे हे जलप्रवाह स्वभावतःच राष्ट्रदा आहेत.[१०]

सरस्वती ही कोणती नदी होती याबद्दल पंडितात एकमत नाही. काहींना वाटते की ती खुद्द सिंधूच होती, तर काहींचा विश्वास आहे की ती सिंधूची उपनदी होती व उत्तर वैदिक काळात ती आटून गेली.[११] कोसंबी सांगतात- '... प्राचीन काळात (पंजाबमध्ये) मुख्य नद्या सात होत्या; त्यातल्या दोन, घग्गर व सर्सूती, या आटून गेल्या ...'[१२]

दोन प्रकारच्या शेतीव्यवस्था, एक नदीच्या पाण्यावर अवलंबून असलेली व दुसरी पावसावर, यांच्यात अतिप्राचीन काळापासून फरक केला जात होता असे दिसते. रामायण (२ १०१. ४५) म्हणते की कोसलांची शेती देवाच्या पाण्यावर अवलबून नव्हती (अ-देव-मातृक ।) कुरूंच्या पांडव गणाचीही जमीन देवाच्या पाण्यावर अवलंबून नव्हती (.. न कृषिर् देव-मातृका ॥ २. ५. ७८). अदेवमातृक कृषीचे आणखी दोन प्रकारात वर्गीकरण केलेले होते- एक नदीच्या पुराच्या पाण्याने भिजवलेल्या जमिनीत गाळपेर शेती करणारी: सिन्धु-वक्त्र वा नदीवक्त्र, व दुसरी नदीच्या पाटाच्या पाण्याने जमीन भिजवणारी: नदीमातृक. पावसावर अवलंबून असलेल्या शेतीला देवमातृक वा इन्द्रवक्त्र म्हणत.[१३]

कोसंबी सिंधुवक्त्र शेतीव्यवस्थेचा प्राचीनतम वृत्तांत उद्धृत करतात-

'सिंधु (खोऱ्याची) हवा व गाळपेर शेतीचे प्राचीनतम वर्णन शिकंदरच्या कप्तानांनी केलेले आहे. ते आणखी महत्त्वाचे याहीकरता आहे की स्ट्राबोला (१५. १ १७–१८) वरचा पंजाब व खालचे सिंधुखोरे यांच्या हवापाण्यातल्या सकृद्दर्शनीच्या तफावतीने गोंधळात टाकले होते:

"(ॲरिस्टोबूलास म्हणाला-) त्यांनी (सिंधूच्या खालच्या पात्राच्या) प्रवासात दहा महिने काढले; परंतु पूर्वेच्या वाऱ्यांचा ऐन जोर होता तेव्हाही त्यांना पावसाचे दर्शन झाले नाही नद्या मात्र काठोकाठ भरलेल्या होत्या व दोन्ही बाजूचे सखल भाग त्यांच्या पाण्याखाली बुडलेले होते. जमिनीवरच्या वाऱ्यांच्या जोरामुळे समुद्र नौकानयनाला लायक नव्हता व जमिनीवरचे सौम्य वारे अजून त्यांची जागा घेत नव्हते. नीअर्कासची नोंद



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अशीच आहे: पण उन्हाळी पावसाबाबत तो ॲरिस्टोबूलॉसशी सहमत नाही; कारण तो म्हणतो की सखल प्रदेशांना उन्हाळ्यात पावसाचे पाणी मिळाले तरी हिवाळ्यात मात्र ते पावसाविना राहातात. दोन्ही लेखक नद्यांचे पाणी वाढायची हकीकत लिहितात. निअर्खास म्हणतो की जेव्हा त्यांनी अकेसायनेज् (चिनाब) जवळ छावणी टाकली, तेव्हा त्यांना नदीचे पाणी जास्त वाढल्यामुळे छावणी उंच जागी हलवावी लागली. पाण्याची वाढलेली पातळी चाळीस क्यूबिट् होती, ज्यापैकी वीस क्यूबिटनी नदी काठोकाठ भरली व बाकीच्या वीसनी सखल भाग जलमग्न केला. ते एकमताने सांगतात की उंचवट्यावर बांधलेली शहरे इजिप्त व इथियोपियाप्रमाणेच बेटासारखी होतात, आणि स्वाति नक्षत्र संपल्यावर पाणी ओसरते तेव्हा ही जलमग्नता संपुष्टात येते. ते असा भर घालतात की जमीन अर्धवट वाळताच ती पेरली जाते, आणि अगदी सामान्य मजुराने मामुली किरा टाकून जरी ती नुसती खरवडली तरी जे पेरले ते परिपूर्णतेला जाते व उत्कृष्ट पीक साकार होते." [१४]

म्हणूनच सरस्वती व इतर नद्यांच्या पाण्याला राष्ट्रदा म्हणत.

राजन् शब्द राज् या धातूपासून बनत असल्याचे निरुक्त (२ ३) सांगतो. निघण्टु राज् (राजति । २.२१.४) हा धातु देतो, पण त्यापासून बनणारा राजन् हा शब्द देत नाही. मात्र राज्ञीचा पर्यायवाची राष्ट्री (२ २१.१) हा शब्द देतो.

५.४६.८ ही ऋचा देवपत्नींची यादी देते– इंद्राणी, इंद्राची पत्नी, अग्नायी, अग्नीची पत्नी; अश्विनी, अश्विनीकुमारांची 'साधारणी' पत्नी; रोदसी, मरुतांची 'साधारणी' पत्नी; वरुणानी, वरुणाची पत्नी; पण राट् ही कोणत्याही देवाची पत्नी नाही. निरुक्त (१२.४६) राट्ची व्युत्पत्ति 'राज्य करणारी' (राड् राजते ।) अशी होते. म्हणून राट् व राष्ट्री हे शब्द पर्यायवाची आहेत.

यावरून असे दिसते की निघण्टूचा संग्रह अशा काळात झाला की जेव्हा राजपद अजूनही स्त्रीजनितच होते याचा अर्थ असा होतो की राजपदाची उत्पत्ती स्त्रीपासून झाली. राजपदाची उत्पत्ती स्त्रीपासूनच का व्हावी? कारण राजपदाची उत्पत्ती राष्ट्रपासून राष्ट्रजमीन गणवटकामध्ये वाटायच्या सर्वांत महत्वाच्या कार्यापासून झाली, आणि हे कार्य सर्वप्रथम स्त्रीच करीत होती. म्हणून मानवांच्या या आद्य राज्यकर्तीचे नामकरण 'राष्ट्री' असे झाले. ८.१००.१० ही ऋचा वाक् ही आद्य राष्ट्री असल्याचे आपल्याला सांगते–

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यद् वाग् वदन्त्य् अविचेतनानि राष्ट्री देवानां निषसाद मन्द्रा ।
चतस्र ऊर्ज दुदुहे पयांसि क्व स्विद् अस्याः परमं जगाम ॥

[ 'जेव्हा वाक् अनाकलनीय शब्द उच्चारीत देवांची विलोभनीय राष्ट्री म्हणून खाली बसली, तेव्हा चौघांनी अन्न व दूध पिळले; पण तिचा सर्वोत्तम वाटा कुठे गेला ? ' ] [१५]

हे चौघे होते– ( १ ) वाक् ( भारती ), ( २ ) सरस्वती, ( ३ ) इळा, व ( ४ ) त्वष्ट्र. दुर्गा खुलासा करतो की देवांमध्ये 'खाली बसून' ( निषसाद ) वाक् पाऊस उत्पन्न करते. पण केवळ खाली बसून ती कशी काही 'उत्पन्न' करू शकते ? ज्या सद् धातूपासून निषसाद बनले आहे त्याचा अर्थ– 'पहुडणे झोपणे,' असाही होतो. त्रियुत गणमाता वाक् धर्मनटी म्हणून तिचा धर्मपती त्वष्ट्र याच्याबरोबर देवगणाच्या समनात पहुडली व त्यातून तिने पाऊस उत्पन्न केला. पाऊस तिचा सर्वोत्तम ( परमं ) वाटा होता व तो निसर्गाच्या नूतनीकरणाकरता गेला.

निर्ऋतीला देवी म्हणत. निरुक्त ( ७.१५ ) देवची व्युत्पत्ती पुढीलप्रमाणे देतो– '... ( देव म्हणायचे ) कारण तो दान करतो ( √ दा ) वा देदीप्यमान् असतो, ( √ दीप् ) तेजस्वी असतो ( √ द्युत ) वा त्याचा लोक स्वर्ग हा असतो. ज्याला देव म्हणतात त्याला दैवतही ( देवता ) म्हणले जाते. ...' [१६]

चौपट, ज्याची उत्पत्ती राष्ट्र–पासून झाली, त्याला 'अधिदेवन–' हो म्हणत. तैत्तिरीय संहितेच्या [१७] राष्ट्रभृत् मंत्रात अधिदेवनाला द्यायच्या हवनाचाही समावेश आहे. राष्ट्रभृत् मंत्रापाठोपाठ अनुमती, राका, सिनीवाली व कुहू या देविकांबाबतचा मंत्र येतो. या दैवीकरण झालेल्या विविध रात्री आहेत. अनुमती म्हणजे शुक्ल पक्षाची चतुर्दशी, राका कृष्ण पक्षाची प्रथमा. सिनीवाली कृष्ण पक्षाची चतुर्दशी व कुहू शुक्ल पक्षाची प्रथमा. [१८] अगोदर उल्लेख केल्याप्रमाणे निर्ऋतीला अमावास्याही म्हटले जात असे इतर सर्व प्राचीन पंचांगाप्रमाणे भारतीय पंचांगही चांद्र होते व आहे. ते दिवसांवर नाही तर रात्रींवर ( तिथि ) आधारलेले आहे. म्हणून या देविका म्हणजे निर्ऋतीची विविध रूपे होती.

४. ३८.१ या अथर्ववेदीय ऋचेप्रमाणे देविनी ही द्यूत खेळणारी स्त्री होती. देवर शब्दाचा अर्थ पूर्व वैदिक काळात 'दुसरा नवरा' ( द्वितीयो वरः । ) असा होत असे, तर नंतरच्या काळात त्याचा अर्थ दीर असा होऊ लागला. पण, १०.४०.२ या ऋचेचे निरूपण करताना निरुक्त ( ३.१५ ) देवर हा शब्द 'दिव्' या 'द्यूत खेळणे या अर्थाच्या धातूपासून बनला असल्याचे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दाखवतो." देव, देवता, देवी, देविन्, देविनी व देविका हे सर्व शब्द मूलतः एकाच धातूपासून, दिव् पासून, बनलेले असावेत हे स्पष्ट आहे. म्हणून, देवी हे मुळात राष्ट्रीचे पर्यायवाची होते व देवी निर्ऋति ही स्त्रीसत्ताक आर्यपूर्व सिंधु संस्कृतीची आद्य राष्ट्री होती.

हे अगोदरच दाखवले गेले आहे की कुलपा वा कुलटा कुलाचे आधिपत्य करी, जनपदकल्याणी वा जनी वा ज्ञातृ ज्ञातीचे, व गणिका गणाचे. परंतु या पदांची उदाहरणे अशा काळातून घेतली आहेत की, जेव्हा मातृसत्ताकता संबंधित भारतीय प्रदेशांमध्ये काळाच्या उदरात गडप झालेली होती व स्त्रिया आपल्या या पदांना मायिक पुरोहितकार्याच्या आधारावरच चिकटून होत्या, जरी या कार्याची अगोदरची सर्वव्यापी सामाजिक 'कार्यक्षमता' लुप्त झालेली होती तरी. जेव्हा स्त्री जमीन व उत्पादित वस्तूंच्या स्वरूपातल्या सामूहिक धनाच्या प्रत्यक्ष व मायिक वाटपाचे कार्य बजावी, तेव्हा ती 'राष्ट्री' वा 'राट्' होती व तिला 'देवी', वा 'अंबा', वा 'मा' असे संबोधले जाई. स्त्रिया गण व त्याच्या घटकांचे राजकीय दृष्ट्या शासन करीत, विवाह स्त्री-प्रधान ( matrilochal ) होता, वंशक्रम व वारसा स्त्रीपरंपरागत होता. याला रूढ इंग्रजी शब्द आहे matriarchy, मातेची सत्ता, मातृसत्ताकता.

मातृसत्ताकतेला भारतीय शब्द आहे 'स्त्री–राज्य', स्त्रीची सत्ता. या शब्दाचा आद्यतम उल्लेख महाभारतात ( १२.४.७ ) येतो, जेथे असे म्हटले आहे की स्त्रीराज्याचा राजा शृगाल कलिंगांच्या राजकन्येच्या स्वयंवराला हजर होता. या स्त्रीराज्याचे भौगोलिक स्थान कोणते होते हे समजू शकत नाही. पांडूने आपली पत्नी कुंती इला नियोगासाठी केलेला आग्रह अगोदरच उद्धृत केलेला आहे; त्याने केलेल्या उत्तर कुरूंच्या वर्णनावरून तेही स्त्री-राज्य असले पाहिजे असे दिसते. पतंजलीच्या महाभाष्यातील 'काश्मीर–राज्ञी'– चा उल्लेख[२०] व कल्हणाचे त्याच्या राजतरङ्गिणीतील काश्मीरचे वर्णन यांचा ते भौगोलिक दृष्ट्या हस्तिनापुरच्या कुरूंच्या उत्तरेला असण्याशी संबंध जोडल्यास हल्लीचे काश्मीर राज्यच त्यावेळी उत्तर कुरु या नावाने ओळखले जाई असे आपण अनुमान काढू शकतो. रामायण ( ७.८७–८९ ), महाभारत ( १.७५.१८–२५ ) व भागवत पुराण (९.१.१३–४२) बाल्हीक-राज्ञी इळा हिची कथा निवेदन करतात.[२१] यावरून दिसते की बाल्हीक हेही स्त्रीराज्य होते. भागवत ( ९. १. ४१ ) सूचित करते की एके काळी द्रविड दक्षिण भारत राज्ञीशासित होता. ग्रीक मेगॅस्थिनीजच्या ( खिस्तपूर्व ४०० ) म्हणण्याप्रमाणे पांड्य राज्यावर एक स्त्री राज्य करीत होती.[२२] अथर्ववेद


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( ५. २२. ७-८, १४ ) मूजवत्, बाल्हीक, महावृष, अङ्ग व मगध हे स्त्रीसत्ताक असल्याचा निर्देश करतो, तर महाभारत ( ८. ४४, ४५ ) वाहीक, आरट्ट, कारस्कर, माहिषक, कलिङ्ग, केरल, कर्कोटक ( मालव्यांची राजधानी[३३] ) व वीरक ( अवंती ?[३४] ) हे मातृवंशक ( matrilineal ) असल्याचे म्हणते. रामायणानुसार ( १. २४-२६ ) गंगा व सरयू यांच्या संगमाच्या दक्षिणेस वसलेल्या करूष व मलद या देशांवर यक्षी ताटकेचे राज्य होते. महाभारत आपल्याला सांगते की गंगेच्या दक्षिणेचे व दक्षिण पंचालाच्या शेजारचे देश राक्षसी हिडिंबाशासित होते ( १. १५१. ५४ ) व एकचक्रा नगरी बकासुरशासित होती ( १ १५६-१६३ ). हरिवंशानुसार ( २. ६. ) मथुरेशेजारचा व यमुनातीरावरचा श-कट ( देवक्षेत्राचा ) देश राक्षसी पूतनेच्या* आधिपत्याखाली होता. वात्स्यायन त्याच्या कामसूत्रातही ( २. ५. २७ ) स्त्रीराज्याचा उल्लेख करतो; पण ते वज्रवन्त देशाच्या पश्चिमेला होते हा व्याख्याकार यशोधराचा खुलासा इतका मोघम आहे की त्यावरून कोणताही अंदाज बांधणे प्रायः अशक्य आहे. महाभारताच्या माहिष्मती वर्णनावरून ( २. ३१. २१-५९ ), जे नर्मदा तीरावरील एका देशाची राजधानी होते व एकेकाळी हैहयांच्या सहस्रार्जुनाचीही राजधानी होते, तेही एक स्त्रीराज्य होते असे दिसते. महाकाव्याचा वृत्तांत सांगतो की अग्निदेवाने दिलेल्या एका वरामुळे माहिष्मतीच्या स्त्रियांवर पुरुषांचे कोणतेही नियंत्रण नव्हते व त्यांचे आचरण पूर्णपणे अनिर्बंध होते ( २.३१.३७-३८ ).

आसामच्या खासींनी या शतकाच्या पंचविशीपर्यंत स्त्रीसत्ताकता, तिच्या मुख्य वैशिष्ट्यांसह, अबाधित ठेवली होती. त्यांच्या समाजरचनेचा वस्तुनिष्ठ वृत्तांत लेफ्टनंट-कर्नल पी. आर. टी गुर्डान नावाच्या एका ब्रिटिश नोकरशहाने लिहून ठेवला आहे. खासी टेकड्यांमध्ये डझनावर राज्ये होती. खिरिम नावाच्या एका राज्याची शासनकर्ती एक स्त्री होती व तीच त्याची पुरोहिता होती.[३५] इतर राज्यांमध्ये राज्य व खेड्यांचे आधिपत्य मातृवंशक होते, म्हणजे मातृवंशपरंपरेतीलच पुरुषांना या पदांचा वारसा मिळे. राज्याच्या अधिपतित्वाबद्दल बोलायचे तर तो वारसा ज्येष्ठतम सख्ख्या बहिणीच्या मुलांना वयातील ज्येष्ठत्वाच्या क्रमानुसार मिळे.[३६] इरावती कर्वे खुलासा करतात—

'...सीमच्या पदावर त्याच्यानंतर त्याचा हयात असलेला ज्येष्ठतम सहोदर भाऊ येतो, भाऊ नसल्यास त्याच्या बहिणींचा ज्येष्ठतम मुलगा,

* पूतना म्हणजे पुत्र देणारी, पालिभाषेतील 'बहुपुत्तका'.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तो नसल्यास त्याच्या बहिणीच्या मुलींचा ज्येष्ठतम मुलगा, व तो नसल्यास त्याचा ज्येष्ठतम मावसभाऊ या पदावर येतो. कोणीही पुरुष वारस नसल्यास त्याची ज्येष्ठतम सहोदर बहीण या पदावर येते, इ. स्त्री सोमनंतर तिचा ज्येष्ठतम मुलगा तिची जागा घेतो.' [२७]

या सर्व राज्यांमध्ये होमहवनाचे काम भगतिणी¶ करीत व पुरुष भगत¶ त्यांचे केवळ मदतनीस असत. [२८] कुलाची भगतीण कुलमातेची कनिष्ठतम कन्या असे. [२९]

वंशक्रम व वारसा स्त्रीपरंपरागत होता. कुलजमिनीचा कारभार आईचा भाऊ, वनी, करी. [३०] स्त्री तिच्या कुलाबाहेर लग्न करी, आणि तिचा नवरा केवळ आगंतुकाप्रमाणे येई व त्याला तुच्छतेने 'जनक' म्हणत. [३१]

चार्लस् ल्याल प्रस्तावनेत समाजाचे साररूपात वर्णन करतो.

'प्रथमतः, ही समाजव्यवस्था अजून अवशिष्ट असलेल्या मातृसत्ताक संस्थांचा असा एक सर्वात प्रमाणभूत नमुना सादर करते की त्याची सुसंगती व परिपूर्णता पाहून पित्याचे स्थान व अधिकारच समाजधारणेचे अधिष्ठान मानायचे अंगवळणी पडलेल्यांना ती अत्यंत वैशिष्टयपूर्ण वाटते. या टेकड्यांच्या साइन्टेंग या सर्वात मागासलेल्या भागात माता ही कुटुंबाची मुख्य आणि नात्याचा एकमेव स्रोत व पाश आहे एवढेच नाही, तर मालमत्तेची ती एकमेव स्वामिनी आहे व वारसाहक्काचे एकमेव उगमस्थान आहे. पित्याचे त्याच्या मुलांशी कसलेही नाते नसते, ते त्यांच्या आईच्या कुलाचे असतात; तो जे कमवतो ते त्याच्या मातृकुलाकडे जाते व त्याच्या मृत्यूनंतर त्याची हाडे त्याच्या मातृकुलाच्या स्मशानभूमीत पुरली जातात. जोवर्यंत तो त्याच्या सासूच्या घरी ना राहातो ना जेवतो, तर केवळ अंधार पडल्यानंतरच जातो. आदिवासी धार्मिकतेचे अधिष्ठान असलेल्या पितरपूजेत आद्य पूर्वजा (का इयाबी) व तिचा भाऊ हीच श्रद्धास्थाने असतात. मृतांची चिरंतन स्मृती म्हणून उभारलेले फळीसारखे दगडी खांब † कुलमातेच्या (मा काइंथी) नावाने ओळखले जातात व त्यांच्या मागच्या बाजूला असलेले खांब मातृपक्षाकडील पुरुष नातेवाईकांच्या नावाने उभे केलेले असतात.' [३२]

अरबांच्या इस्लामपूर्व काळाला 'जाहिलीयाह्' असे म्हणतात—

---

¶ आदिवासी ऋत्विजांसाठी याच संज्ञा समर्पक आहेत.

† आदिवासी 'खांब' म्हणतात व शाहू 'वीर.'

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'जाहिलीयाह् या संज्ञेचा अर्थ बहुधा "अज्ञानयुग" वा "बर्बरता" असा घेतला जातो; पण वास्तवात त्याचा अर्थ होतो अरबस्तानचा असा काळ की ज्यात त्यांना ना राष्ट्रधर्म होता, ना प्रेषित होता, ना धर्मग्रंथ होता.'[११]

'असबियाह्' वा गण व गणघटकांशी निष्ठा ही भावना एवढी प्रभावी होती, की जाहिलीयाह्चा एक कवी गातो–

'गणाशी एकनिष्ठ राहा; त्याचा त्याच्या सभासदांवरील हक्क एवढा जबरदस्त असतो की तो पतीला आपली पत्नी सोडायला भाग पाडू शकतो.'[१४]

उत्तर आफ्रिकेचे बिदून अरब, जे खलिफा उमर म्हणतो त्याप्रमाणे– 'इस्लामचा कच्चा माल होते.'[१५] भटके पशुपालक होते, व त्यांनी इस्लामच्या उदयातून इतिहासात प्रवेश केला: परंतु दाक्षिणात्य अरब मानवसमाजाच्या एका प्राचीनतम संस्कृतीचे शिल्पकार होते. कवी अल्–कुतामी बिदूनांच्या जीवनपद्धतीचे सार सांगतो–

'आमचा पेशा आहे शत्रूवर हल्ले करणे, शेजाऱ्यावर करणे, आणि हल्ला करायला कोणीच नसेल- तर भावावरही करणे!'[१६]

म्हणून असे दिसते की भटके पशुपालक ज्ञाति हा गणघटक टिकवू वा विकसित करू शकत नाहीत: कुटुंबावस्थेत मात्र ते कृषकसमाजाआधी प्रवेश करतात. बिदूनांची छावणी हय नामक अनेक कुटुंबीय तंबूंनी बनलेली असे व या छावणीच्या सर्व सभासदांची मिळून कौम व कुल ही संघटना बने. हय हे मुळात स्त्रीसत्ताक कुल असावे असे दिसते–

'तंबू ही स्त्रीची खास मालमत्ता असल्याचे अरब मानत आलेले आहेत, आणि 'तंबू' (हय) हा शब्द 'हरिम' प्रमाणे स्त्रीवाचक शब्द म्हणून सर्रास वापरला जातो. माणूस सर्वसाधारणपणे "तंबूची" वा "गृहाची स्वामिनी" म्हणून बायको करी ... खुद्द पैगंबरांनाही आपल्या पत्नींच्या वेगवेगळ्या घरांव्यतिरिक्त घर नव्हते, आणि असे सांगितले जाते की एकदा जेव्हा त्यांचे त्या सर्वांशी भांडण झाले तेव्हा त्यांना डोके टेकायलाही जागा उरली नाही. एक अरब लेखक सांगतो की जाहिलीयाह् मधल्या स्त्रिया नुसता तंबू फिरवून त्यांच्या पतींना घालवून देत."[१७]

पितृसत्ताक कुलपतीला 'शेख' म्हणत.[१८] अनेक नातेवाईक कुले मिळून गण बने. ज्याला कबीलाह् म्हणत. कबीलाह्चा सभासद स्वतःला त्या कबीलाहूचा बनु व पुत्र म्हणे–[१९] ज्याप्रमाणे बुद्धाच्या शाक्य गणाचे सदस्य स्वतःला सक्य–पुत्त म्हणत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यांच्या पशुपालक व म्हणून पितृसत्ताक अवस्थेतही बिदून कुलांची नावे स्त्रीलिंगीच राहिलेली होती. यावरून असे दिसते की स्त्रीसत्ताक अवस्थेतून बाहेर पडून त्यांना फार काळ झालेला नव्हता--

'..... "इल्जाची सर्व मुले," अबुल् फदाह् म्हणतो. "ही सर्व उपरिनिर्दिष्ट स्त्रीची, चिंदिफची, संताने आहेत; आणि त्यांना त्यांच्या पित्याचा नामनिर्देशही न करता आईच्या नावानेच ओळखले जाते. त्यांना बनु चिंदिफ् म्हटले जाते, इल्जाच्या नावाचा उल्लेखही होत नाही." तसेच बनु मोझेनांचे नामकरण त्यांचा पिता अम्र याच्यावरून झालेले नसून त्यांच्या मातेवरून झालेले आहे. तीच कथा बनु औवदांची ..... रॉबर्टसन स्मिथच्या मते लेव्हीचा गण मातृनामक होता; तेव्हा तो लिआह्चा गण होता, जिच्याकरता लेव्ही नावाच्या एका पतीची सृष्टी करावी लागली. खुद्द इझ्रेल गण, की ज्याने सबंध देशाला आपले नाव दिले, तो मूलतः साराह्चा गण होता, इझ्रेल हा साराह्चा मुलगा होता....'[१४०]

पाणी, गुरचरण व लागवडीलायक जमीन या अजूनही गणाची सामूहिक मालमत्ता होत्या.'[१]

दक्षिण अरबस्तान यमन, हद्रम्मत व शेजारचा किनारा मिळून बनलेला होता. इझ्रेलचा राजा सॉलोमन याच्या काळात दक्षिण अरबस्तानावर शेबाची राणी राज्य करीत असल्याचे आपण ऐकतो–

'शेबाची राणी (अरबी बिल्किस्), जिने इझ्रेलच्या शहाण्या राजासाठी दक्षिण अरबस्तानची वैशिष्टये असलेल्या अमोल वस्तु भेटीदाखल आणल्या (१, राजे. १० : १०; २ प्रकरण, ९ : ९). ती जर ऐतिहासिक असली तर तिची राजधानी अल यमनमध्ये वा इथियोपियात नसून ती वणिक्पथाच्या उत्तरेस असलेल्या एखाद्या साबायन ठाण्यात वा स्कन्धावारात असावी. सालोमनच्या जीवनकालाला (ख्रिस्तपूर्व १०००) दोन शतके लोटल्यानंतरच यमनी राजांचा शिलालेखांमधे उल्लेख होऊ लागतो.'[१२]

असिरियन राजा तिग्लथ पिलसेर ३ (ख्रिस्तपूर्व ७४५-७२७) याने सीरिया व आजूबाजूचा प्रदेश जिंकला तेव्हा तेथे राण्या राज्य करीत होत्या--

'... त्याच्या राज्याच्या तिसऱ्या वर्षी त्याने "अरिबी" भूमीच्या झबीबी या राणीकडून खंडणी घेतली. नवव्या वर्षी त्याने शम्सी (शम्स वा शम्सीयाह्) नावाच्या अरिबीच्या दुसऱ्या राणीला जिंकले ...'

सेन्नोचरीबने ख्रिस्तपूर्व ६८८ च्या सुमारास– '... स्थानिक देवांना व पुरोहिता असलेल्या खुद्द राणीला (तेल्खुनु, तेएल्खुनु) निनेव्हेहला नेले...'[१३]

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यावरून उघड होते की अरबांच्या तेएल्खन्, झबीबी व शम्सीयाह् या-सारख्या राण्या निर्ऋति व वाक् यांची प्रतिरूपे होत्या. ग्रीकांच्या व रोमनांच्या अभिजात लेखकांच्या वृत्तांतांवरून या काळातले अरब विधिपूर्वक स्वैरसंभोगाच्या व बहुपतित्वाच्या प्रथा पाळीत होते असे दिसते—

'हेच अभिजात लेखक दाक्षिणात्य अरबांच्या संपन्नतेने अत्यंत प्रभावित झाले होते. स्ट्राबो "सुंदर मंदिरे व राजवाडे यांनी नटलेल्या" नगरांचा उल्लेख करतो. एलियस् गाल्लसचा आधार घेऊन प्लिनी (वरील निरीक्षणाशी) सहमत होतो.

'... स्ट्राबो आपल्याला सांगतो की, दक्षिण अरबस्तानात अनेक भावांनी एका पत्नीशी विवाह करायची बहुपतिकता प्रचलित आहे, लोक स्वैर समागमात राहतात, व ज्येष्ठतमाने मुख्य बनायच्या कायद्याचे ते पालन करतात ...'[८४]

ब्रिफॉल्ट या विख्यात अरब लेखकांची प्रमाणे उद्धृत करतो—

'... हिंदूंमधील व चित्रळच्या तद्देशीयांमधील बहुपतिकतेचा उल्लेख करताना अल्-बिरूनी हा तत्त्वज्ञानी अरब लेखक मल्लीनार्थी करतो, की अरबांमध्येही हुबेहूब अशाच संस्था होत्या व "अनेक माणसे एकाच पत्नीशी समागम करीत." बुखारी अशाच प्रकारे म्हणतो की अज्ञानयुगात अरबांमध्ये "अनेक माणसांनी, बहुधा दहांनी, एक पत्नी करायची प्रथा होती".[८५]

ब्रिफॉल्ट उत्तर आफ्रिकेच्या बर्बरांचा कुतूहलपूर्ण वृत्तांत देतो, जे इस्लामचा स्वीकार करूनही स्त्रीसत्ताक रूढचांना चिकटून होते—

'... ते (बर्बर) एक श्वेतवर्णीय जाति असून दक्षिण युरोपच्या रहिवाशात व त्यांच्यात फरक नाममात्रच आहे. अॅटलास टेकडीच्या प्रदेशात तर ते एवढे श्वेतवर्णीय आहेत की त्यांची सहजगत्या आयरिश व स्कॉट लोकांशी गल्लत होईल. अल्जीरिया व ट्युनिशियाच्या बर्बरांनी मोठ्या प्रमाणात मुस्लिम रीतिरिवाजांचा स्वीकार केलेला आहे, व आता त्यांची समाजव्यवस्था पूर्णपणे पितृसत्ताक आहे, पण ज्या गणांनी परकीय आक्रमणापुढे शरणागती स्वीकारण्याऐवजी देशाच्या अंतर्भागात माघार घेणे पसंत केले व जे टॉरेग् (एकवचन टर्गी) या नावाने ओळखले जातात, त्यांनी आपली प्राचीन भाषा व सामाजिक घडण सुरक्षित ठेवलेली आहे. ......

'...... रोमन काळातील त्यांच्या पूर्वजांची, न्यूमिडियनांची ...... नावे आईवरून ठेवलेली असत; ...... स्त्रिया लग्नानंतरही आपल्या मालमत्तेच्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संपूर्ण स्वामिनी राहातात, आणि आपल्या गृहखर्चाचा वाटा उचलणे त्यांच्यावर बंधनकारक नसते व तसे करायला त्या तयारही नसतात. कोणत्या तरी धर्मयुद्ध-मोहिमेबरोबर गेलेला एक वृद्ध जर्मन कवी सांगतो की टयूनिसमध्ये "मालमत्तेच्या वारस स्त्रिया असतात, पुरुष नाही." टर्गी समाजाचे स्त्रीसत्ताक स्वरूप आधुनिक काळात पाहिलेला पहिला प्रवासी म्हणजे इब्न बतूता हा अरब. तो म्हणतो, "स्त्रिया पराकाष्ठेच्या सुंदर आहेत, व त्या पुरुषापेक्षा जास्त प्रभावशाली आहेत. या लोकांचा स्वभाव खरोखरच अजब आहे. कारण मत्सरापासून ते अगदी अलिप्त आहेत. कोणाचेही नामकरण त्याच्या पित्यावरून होत नाही, तर प्रत्येक जण आपल्या वंशाचा मागोवा आपल्या मातुलपक्षाद्वारे घेतो. माणसाचे वारस त्याची स्वतःची मुले नसून त्याच्या बहिणीची मुले असतात ... ... स्त्रियांबद्दल बोलायचे, तर त्या नमाजाच्या पाबंद असल्या तरी पुरुषांपुढे भिऊन वागत नाहीत व आपला चेहरा बुरख्याने झाकून घेत नाहीत. ज्य ला कोणाला त्यांच्यापैकी कोणाशीही लग्न करायची इच्छा असेल तर तो ते करू शकतो, पण कोणतीही स्त्री आपल्या नवऱ्यामागोमाग जात नाही, आणि त्यांच्यापैकी कोणी तसे करू इच्छित असेल, तर तिचे नातेवाईक ते मना करतील." [४६]

बौद्ध, ख्रिश्चन व इस्लाम हे जगातील तीन महान् धर्म जरी प्रारंभापासूनच पितृसत्ताक असले, तरी जे प्रदेश वा देश पशुपालक अवस्था टाळून कृषक अवस्थेत संक्रमण करू शकले, त्यांनी तगवून धरलेल्या स्त्रीसत्ताकतेच्या प्रधान अवशेषांवर हे धर्म मात करू शकले नाहीत. अरबांनी मल्याळींच्या एका मोठ्या विभागाला इस्लामचे अनुयायी बनवले असले व ते त्यांच्यासह मपला म्हणून ओळखले जाऊ लागले असले तरी मातृवंशकता व वैवाहिक स्त्रीप्राधान्यता या दृष्टींनी हा समाज मल्याळी राष्ट्राचा अजूनही अविभाज्य भाग राहिलेला आहे. इरावती कर्वे नमूद करतात—

'बहुतेक मपले वैवाहिकदृष्टया स्त्रीप्रधान व मातृवंशक आहेत, तरीही अल्पसंख्य पण बराच मोठा भाग पितृवंशक व वैवाहिकदृष्टया पुरुषप्रधान आहे. ..

'... मातृवंशक मपल्यांमध्ये घर व इतर मालमत्तेचा वारसा स्त्रीपरंपरागत असतो. धनिक मपल्यांमध्ये पतीने त्याच्या पत्नीच्या घरी जाऊन राहाणे अगदी सर्वसामान्य आहे. जर पित्याची स्वकमाईची मालमत्ता असेल तर ती त्याच्या सर्व मुलांमध्ये विभागली जाते व मुलींना मुलांच्या निम्मे हिस्सा मिळतो.' [४७]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इजिप्तच्या विल्यात प्राचीन कृषक संस्कृतीची वाटचाल स्त्रीसत्ताकतेने सुरू झाली व स्त्रीसत्ताकतेचे अवशेष अरबांनी हा देश जिंकीपर्यंत टिकून राहिले. इजिप्शियन समाजाचा पायाभूत घटक 'नोम' वा स्त्रीसत्ताक कुल होते –

'... 'नोम', वा आद्य कुलचिन्हांकित कुले, ज्यांच्या संघाने इजिप्शियन राष्ट्र बनले होते, मातृप्रणीत कुले, वा मातृग्रामे (motherhoods)* होती; नोमांचे अधिपतित्व वंशपरंपरेने स्त्रियांकडे राहात असे.' "वंशक्रम मातृवंशक होता–

'... वंशक्रमाचा स्रोत पिता नव्हता, माता होती. सर्व कालखंडातील मृतांच्या शिलालेखांवर "मृताच्या वंशक्रमाचा मागोवा मातृपक्षाकडून घ्यायची प्रथा आहे, आपल्यात प्रचलित आहे त्याप्रमाणे पितृपक्षाकडून घ्यायची नाही.." मातृवंशक निर्धारणाची प्रथा ख्रिश्चन काळापर्यंत अबाधित राहिली व ती सातव्या शतकापर्यंत, अरबांनी इजिप्त पादाक्रांत करीपर्यंत, टिकून राहिली. "महत्वाचा माणस म्हणून बहुधा मामाचेच नाव घेतले जाते. माणसाच्या स्वतःच्या पित्यापेक्षा त्याच्या मातामहाचेच महत्व जास्त असते." युवकाच्या संगोपनाची व शिक्षणांची जबाबदारी त्याच्या मातामहावर असे. वंशक्रमाच्या मातृवंशक कायद्यामुळे इजिप्तमध्ये अनौरस मुले नव्हती; कौमार्यात झालेल्या मुलाला नागरीकत्वाचे तेवढेच हक्क असत जेवढे लग्नानंतर झालेल्या मुलाला. सर्व मुलांवर अधिकार मातेचा असे, व घटस्फोट झाल्यानंतर ती तिच्याचपाशी राहात...'[४९]

कुलापासून गणाच्या पातळीपर्यंत पुरोहिताचे काम पूर्वी स्त्रियाच करीत –

'... आद्य राजघराण्यांच्या अमदानीत पौरोहित्यकार्य करणाऱ्या स्त्रियांची नावे फार मोठ्या प्रमाणात आढळतात. १२ व्या राजघराण्यानंतर मात्र 'पदसिद्ध' म्हणून धार्मिक विधी करणाऱ्या राजकन्या व सर्वसामान्यतः स्त्रियांकडेच असलेली दुय्यम दर्जाची धार्मिक पदे यांच्या व्यतिरिक्त पुरोहिता म्हणून एकाही स्त्रीचे उदाहरण आढळत नाही...

'प्राचीन इजिप्तमध्ये राणीही 'रा'ची महापुरोहिता असे व राजकन्या या देवाच्या पुरोहिता असत, आणि त्यांचा बहुतेक वेळ धार्मिक विधी करण्यात जाई. प्राचीन व मध्य राजवंश-कालात स्त्रीपुरोहितांचे अनेक महत्वाचे पंथ प्रचलित होते; आणि, नवसाम्राज्याच्या काळात उच्च ते कनिष्ठ स्तरांमधली अशी एकही स्त्री नव्हती की जिचा मंदिरातल्या पूजाअर्चेशी संबंध नव्हता."..[५०]

---

* महापरिनिब्बानसुत्तात (३ २३.७६) आनंद बुद्धाला विचारतो, "आम्ही, भन्ते, स्त्रियांशी (मातुगामे) कसे वागावे?"

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे अगोदर दाखवले गेलेलेच आहे की मानवजातीचा आद्य 'धर्म' विधिपूर्वक समागम वा संयोग हा होता. कुलटेपासून तर गणिकेपर्यंतच्या सर्व इजिप्शियन पुरोहिता ज्या देवांची पूजाअर्चा करीत त्या देवांच्या धर्मपत्नी असत--

'...राणी ही तेवढी राजाची पत्नी नसे जेवढी ती देवांची पत्नी असे; ....राणी ही अमेन राची (सूर्य देवाची) महापुरोहिता वा पत्नी असे व सर्व राजकन्या जन्मजात हक्काने व जन्मतःच 'राजपत्नी' असत. राजा मकेरीच्या एका कन्येचे, जी काही दिवसच जगली तिच्या पाषाण शवपेटिकेवर वर्णन केले गेलेले आहे, "देवाची प्रियपत्नी, दोन्ही राष्ट्रांची देवी"....'[१]

राजकन्येची सर्वात मानाची पदवी 'राजमाता' वा अंबा ही असे --

'....राजमाता ही पदवी, जी राजघराण्यातल्या प्रत्येक राजकन्येला जन्मसिद्ध हक्क म्हणून प्राप्त होई, ती सर्वात मानाची पदवी होती, आणि शासनकर्त्या राजाशी विवाह केल्यामुळे राजकन्येच्या पदवीत वा दर्जात वा स्थानात कोणतीही भर पडत नसे....'[५२]

इजिप्शियनांची निर्ऋति इसिस् होती. 'वन्य वनस्पती म्हणून वाढत असलेल्या गहू व जवाचा शोध' तिने लावला. पृथ्वीदेव केब् वा गेब् (स्पलिंग Seb) व आकाशदेवता नट् यांच्या देवविवाहातून इसिसचा जन्म झाला. प्लूटार्कने निवेदन केलेली पुराणकथा पुढे सांगते की, इसिसचा जन्म थॉथ देव व चंद्र देवी यांच्यात झालेल्या सोंगट्यांच्या खेळामुळे शक्य झाला.[५३] मूळ पुराणकथेची ही संकीर्ण आवृत्तीसुद्धा सिद्ध करते की इजिप्शियनांची ही आद्य देवी राष्ट्र जमिनीचे शलाकाग्रहणाद्वारे ज्ञातींच्या व कुळांच्या हिश्श्यांचे वाटप करायच्या कार्यातून उदयास आली. इजिप्शियनांचा असा विश्वास होता की प्रत्येक राजकन्या ही जन्मतःच राणी असते, पण कोणताही पुरुष मग तो राजघराण्यात का जन्माला आलेला असेना, जन्मजात राजा नसतो. त्याचे राजा होणे एखाद्या राजकन्येशी विवाहबद्ध होण्यावर अवलंबून असते --

'...राजघराण्यातली प्रत्येक राजकन्या राणी म्हणूनच जन्मत असे व तिच्या जन्मदिनापासूनच त्या पदाची बिरुदे व मानचिन्हे धारण करी, तर पुरुषाला त्यांची प्राप्ती राज्याभिषेकातूनच होई व तो करून घेणे त्याला एखाद्या राजकन्येचा धर्मपती बनण्यातूनच शक्य होई. राजात नाही तर राणीतच राजपदाचा अंगभूत असलेला गूढ वा दैवी गुणधर्म निहित असतो असे मानले जाई; आणि सिंहासनाधिष्ठित पुरुष या पदाच्या कायदेशीरपणासाठी राणी वा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राजमातेवर अवलंबून असतात याचा सर्वात सामर्थ्यशाली व महत्वाकांक्षी राजांनाही कधी विसर पडत नसे.'[५४]

प्राचीन सॅक्सन व डॅनिश राजांनी त्यांच्या खुद्द सापत्नमातांशी व अगोदरच्या राजाच्या वृद्ध राण्यांशी विवाह करायच्या 'घृणास्पद' वागणुकीची उपपत्ती राजपद स्त्रीजन्य असायच्या प्रथेवरूनच लागू शकते—

'... सिंहासनाच्या सॅक्सन इच्छुकांना तोपर्यंत आपला हक्क पूर्णपणे शाबित झाल्याचे वाटत नाही की जोपर्यंत ते राणीशी विवाहबद्ध होत नाहीत. म्हणून व्हारिनीचा राजा हॉर्निगिजिल याने मृत्युशय्येवर असता आपला मुलगा रॉजर याला वाडवडिलांच्या रूढीनुसार त्याच्या सापत्न मातेशी लग्न करण्याबद्दल बजावले. केंटचा राजा एडबाल्ट तसेच करतो; आणि तसेच करतो पश्चिम सॅक्सनांचा राजा एथेलबाल्ड, जो त्याचा पिता एथेल्वुल्फ याच्या विधवेशी लग्न करतो. पश्चिम सॅक्सनांची राणी सिएक्स्बुर्गनेमात्र राज्य स्वतःकडेच ठेवणे पसंत केले. सॅक्सन राजांप्रमाणे डेन कॅन्यूट हा एथेलरेडला पदच्युत केल्यानंतर राणीला, नार्मंडित राहात असलेल्या एका वृद्ध स्त्रीला बोलावणे पाठवतो, आणि आपला राज्यापहार तोपर्यंत वैध मानीत नाही की जोपर्यंत तो तिच्याशी लग्न करीत नाही. हॅम्लेटचा काका फेंग याच पद्धतीने राजमुकुट मिळवतो, आणि खुद्द हॅम्लेटचा विग्लेटकडून वध हॅम्लेटची पत्नी व राज्य मिळण्याकरताच झाला. ...'[५५]

पूर्वी राजा होण्यासाठी पुरुषाला स्त्रीसत्ताक राज्याच्या स्त्रीवारसाशी लग्न करावे लागे याचा निःसंदिग्ध निर्देश खुद्द ऋग्वेदानेच केलेला आहे. उर्वशी आपला पती पुरूरवस् याला १०. ९५. ५ या ऋचेत सांगते —

"त्रिः स्म मा अह्नः श्नथयः वैतसेन उत स्म मे व्यत्यै पृणासि ।
पुरूरवोऽनु ते केतम् आयं राजा मे वीर तन्वस् तद् आसीः ॥

कोसंबी सर्वोत्कृष्ट अनुवाद करतात— "दिवसातून तीन वेळा तू माझ्या (योनी)त लिंगाचा मारा करीत होतास, आणि तू (माझी इच्छा नसताही) मला गर्भवती केलेस. पुरूरवा मी तुझ्या कामनांच्या आधीन झाले. वीरा, मग तू माझ्या शरीराचा राजा झालास."'[५६]

अगोदर सांगितल्याप्रमाणे उर्वशी एक मातृदेवता, भूमातेचे एक रूप, होती, व म्हणून ती एक चिरकुमारी असल्याने कोणालाही आपल्या शरीराचा 'राजा' मानू शकत नव्हती. भारतीय मातृदेवतांचे उद्बोधक विवेचन करूनही कोसंबी या निर्णायक स्वरूपाची दखल घेऊ शकलेले नाहीत. इतर

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वैदिक पंडितांप्रमाणे तेही 'तन्वस्' हा शब्द षष्ठीत घेतात; पण तो जर पंचमीत घेतला तर ते उपवाक्य पुढीलप्रमाणे अर्थ देईल–' वीरा, मग तू माझ्या शरीरापासून राजा झालास." देवी वा राष्ट्री उर्वशीशी विधिपूर्वक संभोग वा देवविवाह करण्यातूनच पुरूरवस् राजा झाला.

राजपदाचा हा स्त्रीपासून उद्‌भव केरळाने थेट सद्यकालापर्यंत सुरक्षित राखलेला आहे. पद्मनाभ मेनन सांगतात –

'मलबारमध्ये चार मुख्य राजघराणी आहेत, त्रावणकोर, कोचीन, झामोरिन व कोलस्त्री ... ...

'प्रथम म्हणजे, ही चार राजघराणी राजकन्यांची बनलेली असून त्यांची मुले सिंहासनाचे क्रमाने उत्तराधिकारी बनतात.

'दुसरे म्हणजे, ज्येष्ठतम राजकन्येला राजमाता असा किताब असतो, मग तिचा मुलगा विद्यमान् राजा असो वा नसो.

'तिसरे म्हणजे, छोट्या राज्यांना त्यांच्या (राज-)घराण्यांच्या (म्हणजे मातृसत्ताक कुटुंबांच्या) नावाने ओळखले जाते.

'चौथे म्हणजे, पहिला व ज्येष्ठ राजा (वयाने ज्येष्ठतम) ज्येष्ठतम राजकन्येचा वंशज असल्याने त्याचा किताब त्याच्या राज्याच्या नावाचा असतो, मग त्या राज्याचा केवळ एक हिस्सा का त्याच्या अमलाखाली असेना. कनिष्ठ राजकन्यांच्या पोटी आलेल्या कनिष्ठ राजांच्या कुटुंबसंज्ञाचा लोप होतो ...' [५७]

राजवारसाक्रमाच्या या मातृवंशक पद्धतीचे मेनन खुलासेवार विवरण करतात –

'... ... उत्तराधिकार, ... ... स्त्रीपरंपरागत असतो; म्हणजे, मृत राजाचा उत्तराधिकारी त्याचा स्वतःचा मुलगा नसतो तर त्याच्या मातृपक्षाकडील स्त्री नातेवाईकांचे संतान असते. या पद्धतीला पितृसत्तेच्या तुलनेत मातृसत्ता असे म्हटले पाहिजे नंतरचा मुद्दा लक्षात घेतला पाहिजे तो हा की उत्तराधिकाराचे नियमन जोपर्यंत त्या कुटुंबात पुरुष सभासद अवशिष्ट असतात, तोपर्यंत, त्यांच्यातील ज्येष्ठतेच्या क्रमाने होते, मग ते मृत राजाच्या मातृपक्षातील ज्येष्ठतम स्त्री नातेवाईकाचे संतान असो वा नसो. मलबारच्या कायद्यात व रीतिरिवाजात असे काहीही नाही की ज्यातून स्त्रियांना सिंहासनाचा उत्तराधिकारी राहण्यापासून वा देशाचे शासन करण्यापासून रोखले जाऊ शकते. पुरुष कुटुंबसदस्यांच्या अभावात ज्येष्ठतम स्त्रीसदस्य उत्तराधिकारी होते. ज्या स्त्रियांना मुले नाहीत त्यांना वारसाहक्काला अपात्र समजले जाते हे बार्बोसाचे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विधान चुकीचे आहे. उत्तराधिकाराचा त्यांना तेवढाच हक्क असतो जेवढा मुले झालेल्यांना. तरीही स्त्रिया सकुल्य शाखेतला कोणताही पुरुष नातेवाईक दत्तक घेऊन त्याच्याकडे राज्यकारभार सुपूर्द करू शकतात. पण असे करायला त्या बांधलेल्याही नसतात. अंतिम स्त्रीवारसापर्यंत त्या क्रमशः राज्य करू शकतात, आणि मग वंशाला नष्ट होण्यापासून वाचवण्याकरता सकुल्य शाखेतल्या पुत्रवती वा पुत्र होण्याची शक्यता असलेल्या स्त्रियांना दत्तक घेतले जाऊ शकते... याचे प्रत्यंतर त्रावणकोरचा राजा बाल राम वर्मा इ. स. १८१० त वारला तेव्हा आले. त्याच्या मागे केवळ दोनच स्त्रीवारस राहिल्या व दोन्हीही राजघराण्यात दत्तक घेतल्या गेलेल्या होत्या: तरीही दोघातली वडील राणी गौरी लक्ष्मीबाई– "रिकाम्या मस्नदीची प्रत्यक्ष व कायदेशीर" उत्तराधिकारी झाली. एका सकुल्य चुलत्याने हरकत घेतली, पण त्याचा दावा नामंजूर झाला, "आणि त्या तरुण राजकन्येला मद्रास सरकार व ईस्ट इंडिया कंपनीचे सन्माननीय संचालक मंडळ यांच्या विद्यमाने लगेच राज्याभिषिक्त करण्यात आले." १८१३ त राणीला एक राजकुमार झाल्यानंतर या कुमाराला त्रावणकोरचा राजा म्हणून घोषित करण्यात आले व राजमाता या बालराजातर्फे पालक म्हणून राज्यकारभार चालवीत राहिली. राणी नंतर दोन वर्षांनी वारली, व राजा अजून अल्पवयी असल्याने त्याची मावशी, कालवश राणीची बहीण, जिला अजून मुलगा व मुलगी काहीच झालेले नव्हते, राजा वयात येईपर्यंत पालक म्हणून उत्तराधिकारी झाली. आणि घटनेचे वैशिष्ट्य हे आहे की या सर्व काळात राज्याचे शासन करण्यासाठी कुटुंबात एखादा पुरुष दत्तक घ्यायचा विचारही डोकावला नाही. खरे पाहता, त्रावणकोर राजघराण्यात पुरुष दत्तक घेतला गेल्याचे अजून एकही उदाहरण ऐकिवात नाही. ....'[५८]

या वारसाहक्काचा जास्त खुलासा होणे जरूर आहे. विद्यमान् राजाला महाराज म्हणत व उत्तराधिकारीला युवराज. ज्येष्ठतम राजकन्येला ज्येष्ठ (मूट्ट) राणी म्हणत व तिच्या खालोखाल वडील असलेलीला कनिष्ठ (एळय) राणी. राज्याच्या सर्व वारसदारांचे मिळून राजथरवाड बनलेले असे.

आता हे थरवाड म्हणजे काय आहे? इरावती कर्वे याचा अर्थ 'मातृवंशक एकत्र कुटुंब' म्हणून करतात.[५९] आपण हे अगोदरच पाहिलेले आहे की एकत्र कुटुंब व्यक्तिगत मालमत्ता अस्तित्वात आल्यानंतरच उदयास येते. जरी जमिनीची खरेदीविक्री मध्ययुगीन केरळात सुरू झालेली होती,[६०] तरी त्याचा अर्थ एवढाच होतो की जमीन ही 'क्रयवस्तु' झालेली होती, पण


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ती अजून 'खाजगी मालमत्ता' बनलेली नव्हती. जमिनीची खाजगी मालमत्ता ही पितृसत्ताक एकत्र कुटुंबाची त्याच्या जन्मापासून अखंड सांगाती असते. कुटुंबाच्या जमीन व इतर मालमत्तेची मालकी पुरुष कुटुंबप्रमुखाकडे असते आणि स्त्रियांची 'स्त्री-धनाव्यतिरिक्त कशावरही मालकी व उत्तराधिकार असत नाही. पितृसत्ताक एकत्र कुटुंबाचे वैशिष्टच असते बहुपत्नीकता ( खिश्चन वगळून ), तर मातृवंशक 'कुटुंबाचे' वैशिष्टच असते बहुपतिकता. नायरांमधल्या बहुपतिकतेचा या शतकाच्या सुरवातीबरोबर लोप झालेला असला, तरी केरळातल्या काही मागासलेल्या जातींमध्ये ती अजून रूढ आहे.[६१] बहुपतिकता व जमिनीची खाजगी मालमत्ता या परस्परवर्जक आहेत. हिमालयाच्या तळटेकडयांमधील खशांपेक्षा याचा सरस दाखला असू शकत नाही, जे आपल्या बहुपतिकतेचे समर्थन खालीलप्रमाणे करतात--

'.... खश प्रतिपादन करतात की बहुपतिकता पाळल्याने त्यांच्या वाडवडिलार्जित जमिनी अक्षुण्ण राहिलेल्या आहेत, तर शेजारच्या लोकांनी बहुपतिकतेचा त्याग केल्याने वेगवेगळया भावांच्या वारसांमध्ये जमिनीचे हिस्सेवाटे पडले आणि मग देशोधडीला लागून त्यांना खालच्या प्रदेशात जावे लागले व घरगडी बनावे लागले.'[६२]

थरवाड जमिनींचे त्याच्या थावळींमध्ये विभाजन गैरहजर जमीनदारीला आळा घालू पाहाणारे कुळकायदे अमलात आल्याबरोबर सुरू झाले. त्यापूर्वी थरवाड व त्याच्या थावळी कशीत असलेल्या जमिनी थरवाडच्या सामायिक मालकीच्या होत्या.[६३]

ज्याप्रमाणे एक कुल अनेक कुलांना जन्म देत असे, त्याप्रमाणे एक थरवाड अनेक थावळींना जन्म देत असे—

'थरवाड वा मातृसत्ताक एकत्र कुटुंब एका सामायिक पूर्वजेच्या सर्व वंशजांचे बनलेले असते. वृद्धतमशासक मातेचा पति वा पतिवृंद– ज्यांचे प्रतिनिधित्व नंतर तिचा भाऊ कर्णवन् करू लागला– त्यांच्या मातृथरवाडमध्येच राहात व आपापल्या पत्नीला वा पत्नींना आगंतुकासारखे भेटायला येत. असे थरवाड कुटुंब कालानुक्रमात एवढे मोठे होई की त्याचे सभासद शंभर वा त्यापेक्षा जास्त होत तेव्हा ते थावळींमध्ये विभाजित होई. येथे पुन्हा वंशक्रम व वारशाच्या स्त्रीपरंपरेचे तत्त्व जारी होई, जे थावळीची व्युत्पत्तीही दिग्दर्शित करते. थ धातूचा अर्थ होतो माता व वळीचा वंशक्रम वा वारसा.'[६४]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

थावळी व त्यांची जननी थरवाड याना बांधणारे पाश रक्ताची नाती व जमीन हे होते. थरवाड व त्याच्या थावळी यांचे एकमेकांशी तेच नाते होते जे ज्ञातीचे तिच्या कुलांशी.

अशाप्रकारे राजथरवाडचा अर्थ होतो राजज्ञाति व ते थावळी वा कुलांचे बनलेले असे. कोचीनचे राजथरवाड मुळात पाच थावळींचे बनलेलें होते– ( १ ) मूट्ट थावळी, ( २ ) एळय थावळी, ( ३ ) मुन्नूर थावळी, (४) चालियूर थावळी, व (५) पळ्ळिविरुट्टी थावळी.[६५] ही राजज्ञाति आता कोचीनच्या त्रिपुन्नथेर नावाच्या राजउपनगरात शंभर घरांमध्ये वसलेली आहे.[६६]

इरावती कर्वे चार थावळींनी बनलेल्या एका राजथरवाडवरून वारसाक्रमाच्या कायद्याचे दिग्दर्शन करतात–

‘माणसाचा ( राजाचा ) उत्तराधिकारी वयानुक्रमात तदनंतरचा होतो. हा उत्तराधिकारी या चारीपैकी कोणत्याही एका थवळीचा असू शकतो. अशाप्रकारे थारवडचे सर्व हयात पुरुष मिळून वारससंचय बनतो. ज्यातून प्रत्येक प्रसंगी ज्येष्ठतम जीवित पुरुष महाराजपदाचा उत्तराधिकारी होतो. आपल्याला आढळते की महाराजा १ ने १८६३ पर्यंत राज्य केले. त्याच्यानंतर महाराजा २ गादीवर आला जो महाराजा क्रमांक १ च्या भगिनी क्रमांक २ चा मुलगा होता. महाराजा ३ हा महाराजा २ चा भाऊ होता. महाराजा ४ हा महाराजा ३ च्या एका मावशीचा मुलगा होता. महाराजा ५ हा महाराजा ४ च्या समवयस्क मावसबहिणीचा मुलगा होता व म्हणून ‘भाचा’ होता. महाराजा ६ हा महाराजा ५ च्या मावसआजीचा मुलगा होता व महाराजा ५ चा एक ‘मामा’ होता. महाराजे ७ व ८ हे भाचे होते ( महाराजा ६ च्या समवयस्क मावसबहिणीची मुले व महाराजा ५ चे भाऊ ). महाराचा ९ हा महाराजा ८ चा समवयस्क मावसभाऊ होता. महाराजा १० हा एका समवयस्क मावसबहिणीचा मुलगा असून विद्यमान् महाराजा आहे व विद्यमान् युवराज हा या महाराजाचा ‘मामा’ आहे ...’[६७]

ज्येष्ठ ( मूट्ट ) राणी व कनिष्ठ ( एळय ) राणी वा पदांचा वारसाक्रमही विद्यमान् राजाशी असलेल्या अनुक्रमे माता व भगिनीच्या नात्यांवर अवलंबून नसून ज्येष्ठताक्रमाच्या नियमावरच अवलंबून असतो–

‘महाराजा १ राज्य करीत असता त्याची आई, ज्येष्ठ राणी १ काही काळ ज्येष्ठ राणी होती. त्याची ज्येष्ठतम भगिनी असलेली कनिष्ठ राणी १८७९ त, आईच्या ज्येष्ठ राणीपदाच्या काळात, वारली. ज्येष्ठ



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राणीच्या मृत्यूनंतर बाकीच्या मुली एकामागून एक ज्येष्ठ राण्या झाल्या. ज्येष्ठ राणी क्रमांक २ ही महाराजा २ व महाराजा ३ यांच्या अमदानीत, जे तिचे पुत्र होते, ज्येष्ठ राणी होती. ज्येष्ठ राणी ३ ही तिच्या बहिणीचा मुलगा महाराजा ३ च्या अमदानीत ज्येष्ठ राणी होती. अशाप्रकारे महाराजा १ च्या वेळी त्याची आई ज्येष्ठराणी होती; महाराजा २ च्या काळी त्याची आजी व नंतर त्याची आई या ज्येष्ठ राण्या होत्या; महाराजा ४ च्या काळी, ज्याने १९११ त राज्यत्याग केला, त्याची आई (३), नंतर त्याची मावशी (४), व नंतर त्याच्या दोन मावस बहिणी (५) व (६) या ज्येष्ठ राण्या होत्या.[१६८]

मातृवंशक उत्तराधिकारक्रमाच्या कायद्यातील हे वैशिष्टयपूर्ण नातेसंबंध आकृतीत खालीलप्रमाणे दिसतील —




[टीप : अखंड रेषा मातृसंबंध दाखवतात, व तुटक रेषा बाणाने दाखवलेल्या महाराजाच्या काळातील ज्येष्ठ राणीपदे दर्शवतात.]

पितृसत्ताक राजपदात ज्येष्ठ राणी ही राज्यकर्त्या राजाची खरोखरच माता (राजमाता) असते, तर कनिष्ठ राणी ही त्याची पट्टराणी (महिषी) असते. मातृवंशक राजपदात ज्येष्ठ राणी ही राज्यकर्त्या राजाची माताच असते



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असे नाही व कनिष्ठ राणी ही त्याची मातृपक्षाकडील रक्तसंबंधी नातेवाईक असते, तर त्याची पत्नी ही राजथरवाडातील नसल्यामुळे, म्हणजे अन्य थरवाडातील असल्यामुळे, त्याच्या प्रजेला ती ठाऊकही नसते.

परंतु ए. एल्. बाशामसारखे ख्यातनाम पाश्चिमात्य पंडित प्रतिपादन करतात की केरळात मातृवंशक समाजव्यवस्थेचा विकास बाराव्या शतकानंतर झाला.

'मलबारमधील चेर राज्याच्या प्राचीन कालखंडात वारसा पुरुषपरंपरेने चाले, परंतु १२ व्या शतकाच्या सुमारास मातृवंशक व्यवस्था सुस्थिर झाली, ज्या अन्वये राज्याचा वारस राजाच्या मुलाऐवजी त्याच्या ज्येष्ठतम भगिनीचा मुलगा होऊ लागला. मरुमक्कट्टायम् नावाची ही व्यवस्था कोचीन व त्रावणकोरमध्ये राजउत्तराधिकार व मालमत्तांचा वारसाहक्क या दोन्हींसाठी अगदी आतापर्यंत जारी राहिली. मलबारमध्ये कदाचित् अगदी प्राचीन काळात ती अस्तित्वात असेल, परंतु ब्राह्मणी प्रभावामुळे वरिष्ठ वर्गांनी काही काळ तिचा त्याग केला व काही शतकानंतर तिचे पुनरुज्जीवन केले ... ...'[६९]

बाशाम यांच्या म्हणण्याप्रमाणे जरी राज उत्तराधिकाराच्या स्त्रीसत्ताक कायद्याची जागा राज उत्तराधिकाराच्या मातृवंशक कायद्याने घेतली, तरी नंतरच्या काळात तो वर विवरण केल्याप्रमाणे विकसित झाला हे लक्षात घेणे जरूर आहे. बाशाम यांचे दुसरे म्हणणे की, राज उत्तराधिकाराचा व वारसाहक्काचा मातृवंशक कायदा केरळात बाराव्या शतकाआधी अस्तित्वात नव्हता, याचे जास्त जवळून परीक्षण करणे आवश्यक आहे.

मातृवंशकतेची सर्वात आवश्यक पूर्वशर्त आहे जमिनीची सामूहिक मालकी. पण जर पशुपालक अवस्थेतून एखाद्या समाजाने कृषक अवस्थेत संक्रमण केले तर मात्र तो मातृवंशक बनत नाही. अशा प्रकारच्या विकासक्रमात तो समाज पशुधनाच्या सामूहिकमालकीकडून पशु व जमीन या दोहोंच्या सामूहिक मालकीकडे स्थित्यंतर करतो, आणि या दोन्ही अवस्थांमध्ये वंशक्रम व वारसाहक्क पितृवंशीयच राहातात.

पशुपालकांच्या संपत्तीपासून, पशुधनापासून, मालमत्तेच्या विभाजनाला प्रारंभ झाला. तैत्तिरीय संहिता (३.१.९.४–६) सांगते की, जेव्हा मनूने त्याच्या मुलांमध्ये त्याच्या पशुधनाच्या मालमत्तेची वाटणी केली, तेव्हा नाभानेदिष्ठ गैरहजर असल्यामुळे त्याला त्याचा वाटा मिळाला नाही. मनूने त्याला आज्ञा केली की त्याने आपल्या वाट्याची भरपाई अंगिरसांच्या यज्ञसत्रात ऋत्विजांचे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

काम करून दक्षिणेदाखल मिळणाऱ्या पशुधनाने करून घ्यावी.[७०] येथे हे लक्षात घेतले पाहिजे की 'भाग वा वाट्याचा अर्थ 'कबजा' चा हक्क असा घेतला पाहिजे, 'स्वामित्वा'चा हक्क असा नाही. या मुद्याचे सांगोपांग विवरण शेवटच्या प्रकरणात येईल. येथे एवढे सांगणे पुरेसे आहे, की पशुधनातील मालमत्तेचे विभाजन याचा अर्थ पशुधनाच्या व्यक्तिगत मालमत्तेचा उदय असा होत नाही. त्याचा अर्थ एवढाच होतो, की मनूच्या प्रवराच्या ( पितृसत्ताक ज्ञाति ) मालकीचे पशुधन स्वतःची गोत्रे व पितृसत्ताक कुले स्थापलेल्या त्याच्या वंशजांमध्ये वाटले गेले.

ब्रिटिशांनी केरळ जिंकण्यापूर्वी तेथे जमिनीवरचा कर अस्तित्वात नव्हता.[७१] मुळात सर्व जमीन देवळांच्या मालकीची होती, किंवा दुसऱ्या शब्दात सांगायचे तर गणाचा देव वा देवतेच्या मालकीद्वारे सामूहिक मालकीची होती.[७२] ग्राम-क्षेत्रम्‌चा मल्याळीत अर्थ मंदिर व त्याची जमीन असा दोन्ही प्रकारे होतो.[७३]

ज्याप्रमाणे गणमाता ही मृत्यूनंतर त्या गणाची मातृदेवता बने, त्याचप्रमाणे त्या गणाची राष्ट्रजमीन त्या देवतेच्या 'मालकीची' होई. अथर्ववेदीय भूमिसूक्ताची १२. १. ६२ ही ऋचा भूमातेला आळवते –

'पृथ्वी (माते), तुझ्या कुशीतून बाहेर पडलेले आम्ही सर्व रोगांपासून, क्षयापासून मुक्त असू दे. प्रबुद्ध होऊन दीर्घायुष्याला सामोरे जाणारे आम्ही तुझे बलिवाहक असू दे ( वयं तुभ्यं बलि-हृतः स्याम ॥ ).'[७४]

बलि येथे भागाचा पर्यायवाची आहे. जो बलिभाग गणमाता वा राष्ट्री स्वतःसाठी काढून ठेवी, तो तिच्या मृत्यूत्तर झालेल्या तिच्या दैवीकरणात गणाकडून तिला दिला जाणारा बलि बनला.

अंग देशाच्या चंपा नगरीचे सोणदण्ड ब्राह्मणासारखे ब्रह्मदेय्यधारक आपल्या सगोत्रीयांना ( कुलसदस्यांना ) सांगत की बुद्ध त्यांच्या गामक्खेत्तात उतरलेला असल्याने रीतिरिवाजानुसार अतिथि म्हणून त्याचा सत्कार केला पाहिजे ( "केचि समणा वा ब्राह्मणा वा अम्हाकं गामक-खेत्तं आगच्छन्ति अतिथी नो ते होन्ति ।" ).[७५] सर्वात निर्णायक पुरावा खत्तिय संघ-गण सादर करतात. मरणोन्मुख बुद्ध आनंदला कुसीनाराच्या मल्लांना सूचना द्यायला सांगतो की महापरिनिर्वाण त्यांच्या गामक-खेत्तात होत आहे ( 'अम्हाकं च नो गामक्‌-खेत्ते तथागतस्स परिनिब्बानं अहोसि ।' ).[७६]

केरळाचा व त्याच्या समाजव्यवस्थेचा आद्यतम उल्लेख महाभारतात येतो. वाहीक देशातल्या मद्रांचा राजा शल्य याच्याशी झालेल्या वादात कर्ण खालील देशांचा निषेध करतो ( ८. ४४. ४३, ४५. २८ ) –

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"कारस्करान् माहिषकान् कुरण्डान् केरलांस् तथा ।
कर्कोटकान् वीरकांश् च दुर्धर्मांश् च विवर्जयेत् ॥

["अधार्मिक कारस्कर, माहिषक, कुरण्ड, केरल, कर्कोटक व वीरक यांचा (संसर्ग) वर्ज्य करावा.]

"प्राच्या दासा वृषला दाक्षिणात्याः ।
स्तेना वाहीकाः सङ्करा वै सुराष्ट्राः ॥"

["पौर्वात्य (लोक) दास (गुलाम) आहेत, दाक्षिणात्य (द्रविड) शूद्र (गुलाम) आहेत, वाहीक डाकू आहेत व सौराष्ट्राचे (लोक) लेकवळे आहेत."]

कडव्या पितृसत्ताकवादी कर्णाच्या या निषेधाचे खरे कारण हे देश मातृवंशक होते हे होते (८.४५.१३)-

"तस्मात् तेषां भाग-हरा भागिनेया न सूनवः ॥"

["म्हणून त्यांच्या बहिणींची मुले त्यांचे दायाद असतात, स्वतःची मुले नाहीत.]

दक्षिण भारताचे लिखित इतिहासात पदार्पण ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकात होते—

'.... मेगॅस्थिनीजचा हवाला देऊन प्लिनी सांगतो की भारतीय राष्ट्रांमधले 'पाण्डे' हे एकच (राष्ट्र) स्त्रीसत्ताक होते. जरी हे विधान मदुरेच्या पांड्यांना लागू नाही हे स्पष्ट असले तरी ते मलबारच्या एका विशिष्ट सामाजिक प्रथेला निर्विवादपणे लागू आहे की ज्या अन्वये वारसा-हक्क कुटुंबात स्त्रीपरंपरेने चालत असतो.'[७७]

यानंतर येणाऱ्या संगम काळाचा इ० स० च्या दुसऱ्या शतकात अंत होतो. नीलकंठशास्त्रींना असे वाटते की या काळात सर्व दक्षिण भारतीय देशांमध्ये कुल-संघ पद्धतीची शासने होती —

".... चेर राज्य एक प्रकारची कौटुंबिक मालमत्ता असली पाहिजे की ज्यात सर्व कर्त्या पुरुषांचा भाग व हितसंबंध असतो. कौटिल्य याला कुल-संघ, कुटुंब संघ, म्हणतो, व त्याला तो अत्यंत कार्यक्षम शासनव्यवस्था मानतो. अशाच प्रकारची कुलसत्ता या काळात चोल व पांड्य राज्यांमध्ये प्रचलित असणे संभवनीय आहे....'[७८]

— अपूर्ण

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संदर्भ --

१. ए. के. कुमारस्वामी, स्पिरिच्युअल अॅथॉरिटी अँड टेंपोरल पॉवर इन इंडियन थिअरी ऑफ गव्हर्मेंट, पा. १६.
२. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४१, पा. १०९.
३. ए. के. कुमारस्वामी, उक्त, पा. १८.
४. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४१, पा. १०९–१११; तैत्तिरीय संहिता, १-८-१६; वाजसनेयि संहिता, १०-२८.
५. डब्ल्यू. डी. व्हिटने, अथर्ववेद संहिता, पा. ६२६
६. एम. एम. कुंटे, द व्हिसिसिट्यूड्स ऑफ आर्यन सिव्हिलिझेशन, पान. ७८.
७. जे. जी. फ्रेझर, स्पिरिट्स ऑफ द कॉर्न अँड ऑफ द वाइल्ड, खंड १, पा. ११५.
८. उक्त, पा. १२३.
९. उक्त, पा. १२४.
१०. श्रीधरशास्त्री पाठक; वाजसनेयि संहिता, पा. १४५–१४६.
११. वेदिक इंडेक्स, खंड २, पा. ४३४.
१२. दा. ध. कोसंबी, द कल्चर अँड सिव्हिलिझेशन ऑफ एन्शंट इंडिया इन हिस्टॉरिकल आउटलाइन, पा. ६२.
१३. वासुदेव शरण अग्रवाल, इंडिया अॅज नोन टु पाणिनि, पा. ६६.
१४. दा. ध. कोसंबी, अॅन इन्ट्रॉडक्शन टु द स्टडी ऑफ इंडियन हिस्टरी, पा. ६६.
१५. लक्ष्मण सरूप, निघण्टु अँड निरुक्त, पा. १७८.
१६. उक्त, पा. १२१.
१७. उक्त, पा. १७८.
१८. उक्त, पा. १७८–१७९.
१९. उक्त, पा. ४८.
२०. बलिनाथ पुरी, इंडिया इन द टाइम ऑफ पतञ्जलि, पा. ७३-७४.
२१. महाभारत, १.१५. १८–२५; दा. ध. कोसंबी, मिथ अँड रिॲलिटी, पा. ४२–८१.
२२. पद्मनाभ मेनन, हिस्टरी ऑफ केरळ, खंड १, पा. ६५–६६; के. ए. नीलकंठ शास्त्री, हिस्टरी ऑफ साउथ इंडिया पा. ८१–८२.
२३. गौरीशंकर ओझा, राजपूताने का इतिहास, खंड १, पा. ३४.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

२४. मृच्छकटिक, अंक ६.
२५ पी. आर. टी. गुर्डान, द खासीज, पा. ७०.
२६. उक्त, पा. ६८.
२७. इरावती कर्वे, किनशिप ऑर्गनायझेशन इन इंडिया, पा. ४१६.
२८. पी. आर. टी. गुर्डान, उक्त, पा. २१.
२९ उक्त, पा. ८३, ८७–८८.
३०. इरावती कर्वे उक्त, पा. ४१६.
३१. पी. आर. टी. गुर्डान, उक्त पा. ८२.
३२. उक्त, पा. एकुणवीस वीस.
३३. पी. के हिट्टी, हिस्टरी ऑफ द अरब्स, पा. ८७.
३४. उक्त, पा. २७.
३५. उक्त, पा. २९.
३६. उक्त, पा. २५.
३७. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, द मदर्स, खंड १, पा. ३७३–३७४.
३८. पी. के. हिट्टी, उक्त, पा. २८.
३९. उक्त, पा. २८.
४०. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, पा. ३७०–३७२.
४१. पी. के. हिट्टी, उक्त, पा. २६.
४२. उक्त, पा. ४२.
४३. उक्त, पा. ३८.
४४. उक्त, पा. ४८.
४५. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, पा. ७१४–७१५.
४६, उक्त, पा. २८५–२८६.
४७. इरावती कर्वे उक्त, पा. २९३–२९४.
४८. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, पा. ३८१.
४९. उक्त, पा. ३७९–३८१.
५०. उक्त, पा. ३८७; खंड २, पा. ५१५–५१६.
५१. उक्त, पा. ३७–३८.
५२. उक्त.
५३. जे. जी. फ्रेझर, अदोनीज अत्तिस ओजिरीज, खंड २, पा. ६–८.
५४. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, खंड १, पा. ३७८.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

५५. उक्त, पा. ४१६.
५६. दा. ध. कोसंबी, उक्त, पा. ५०.
५७. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड २, पा. १–२.
५८. उक्त, पा. २–३.
५९. इरावती कर्वे, उक्त, पा. ११, ३०२–३०३, ३६६.
६०. ई. एम. एस. नंबूदिरिपाद, केरल : यस्टर्डे, टुडे अँड टुमारो, पा. ४५.
६१. उक्त, पा. १७–१८.
६२. इरावती कर्वे, उक्त, पा. १३२–१३३.
६३. उक्त, पा. ११ ३६६.
६४. ओ. आर. एहरेनफेल्स, मदर–राइट इन इंडिया, पा. ६१.
६५. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड १, पा. ४८०–४८१.
६६. इरावती कर्वे, उक्त पा. २९८.
६७. उक्त, पा. ३६६–३६७.
६८. उक्त, पा. ३६८.
६९. ए. एल. बाशाम, द वंडर दॅट वॉज इंडिया, पा. ९३.
७०. ऐतरेय ब्राह्मण, ५-१४.
७१. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड २, पा. ३४४–३४९.
७२. उक्त, पा. २९५–२९६, २९९–३०२: ई. एम. एस. नंबुदिरिपाद, उक्त, पा. ४५,४८,४९; डब्ल्यू. रॉबर्टसन स्मिथ, रिलिजन ऑफ द सेमाइट्स पा. ९५–९६.
७३. पद्मनाभ मेनन, उक्त, पा. ३२९; ई. एम. एस. नंबूदिरीपाद, उक्त पा. ४९.
७४. डब्ल्यू. डी. व्हिटने, उक्त, पा. ६७२.
७५. जगदीश काश्यप ( सं. ), दीघनिकायपालि, सीलक्खन्धवग्ग, ४-१-५; ५-१ १०.
७६. उक्त, महावग्ग, ३ २३.८३; द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ११, पा. १०२.
७७. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड १, पा. ६५–६६; के. ए. नीळकंठशास्त्री, उक्त, पा. ८१–८२.
७८. उक्त, पा. ११५.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

डॉ. सु. बा. कुलकर्णी

# द्राविड भाषा परिवार

## ( उत्तरार्ध )

### ज्येष्ठ भारतीय भाषाभगिनी : तमिळ

द्राविड परिवारातील सर्वात प्राचीन भाषा तमिळ ही होय, प्रचलित भारतीय भाषांतही हिच्याइतका प्राचीन इतिहास दुसऱ्या कोणत्याही भाषेस नाही. ही भाषा प्रामुख्याने हल्लीच्या तामिळनाडु राज्यात व श्रीलंकेमध्ये बोलली जाते. तमिळभाषी लोक धाडसी व व्यवहारचतुर असल्याने व्यवसाया-निमित्त परप्रांती व परदेशी जाण्यास नेहमीच तयार असतात. ख्रिस्ती शतका-पूर्वीपासूनच त्यांनी श्रीलंकेमध्ये वसाहती केलेल्या आढळतात. पेरू, पेनांग, त्रिनिदाद, सिंगापूर, जमैका व अतिपूर्वेकडील कित्येक ठिकाणी यांच्या वसाहती आहेत. फिजी व मॉरिशस बेटांतही यांची प्रचंड वस्ती आहे. सध्याची भारतातील तमिळ भाषिकांची संख्या ३ कोटी ५ लक्षांहून अधिक आहे.

तमिळ भाषेच्या प्राचीन काळापासून अभिजात किंवा 'शेन तमिळ' व व्यावहारिक किंवा 'कोडुन तमिळ' या दोन प्रमुख शैली आहेत, व्यावहारिक तमिळच्या सामाजिक भेदांनुसार ब्राह्मण व ब्राह्मणेतर व भौगो-लिक भेदांनुसार उत्तर ( मद्रास ) व दक्षिण ( मदुरै ) अशा चार प्रमुख बोली आहेत. श्रीलंकेतही तमिळच्या जाफना, त्रिकोमाली, कोलंबो अशा तीनचार बोली आहेत. तमिळ भाषाक्षेत्रात तंजावर येथे तंजावरी ही मराठी बोली, तर मदुरा येथे सौराष्ट्री ही गुजराती बोली बोलली जाते. याशिवाय वाघरी नावाची भिल्ली बोलीही भटक्या जमातींकडून बोलली जाते.

इसवी सनाच्या प्रारंभ काळापासूनच तमिळ भाषेत शिलालेखादींचे लेखन व साहित्यनिर्मिती झालेली आढळते प्राचीन तामिळनाडूचे चेर, चोल व पांड्य असे तीन विभाग होते. तेथील राजघराण्यांचा साहित्यिकांना उदार आश्रय मिळे, यामुळेच साहित्यनिर्मितीस प्रोत्साहन मिळून पांड्यांच्या प्रदेशात

अनुक्रमणिका






राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लागोपाठ तीन साहित्य संघ निर्माण झाले. या संघाचे सभासद राजे, कवी व काही देवही असत ! या साहित्य संघाच्या लिखाणास संगम साहित्य अशी संज्ञा आहे. संगमसाहित्याचे एकंदर नऊ खंड असून त्यातील आठ खंडात लहानलहान काव्ये व नवव्या खंडात दीर्घ काव्ये समाविष्ट केलेली आहेत. पहिल्या व दुसऱ्या साहित्य संघाचे लिखाण जवळजवळ नाहीसे झाल्याने यात प्रामुख्याने तिसऱ्या संघाचेच काव्य आलेले आहे. उपलब्ध साहित्यात २२७९ काव्ये आलेली असून त्यांची लांबी ४–५ ओळी ते ८०० ओळींपर्यंत आहे. एकंदर ४७३ कवींची हजेरी लागलेली असून संपूर्ण लिखाण सुमारे ३३००० ओळीं इतके भरेल. साधेपणा, सुटसुटीतपणा व कल्पनावैभवाने संपन्न असलेल्या या साहित्यातील काही गीते संगीत तत्त्वावर आधारलेली दिसतात. यात देवता धर्म, देवळे, मठ यांचे अनेक उल्लेख असून प्राचीन द्रविड सस्कृतीच्या इतिहासाचे हे एक प्रमुख साधन आहे. नंतरच्या काव्यात आढळणारी भक्ति-भावना व सांप्रदायिकता या साहित्यात अभावानेच आढळतात. या एकंदर साहित्याची निर्मिती इसवी सनाच्या दुसऱ्या ते सातव्या शतकात होऊन पाचव्या ते सातव्या शतकात ते संग्रहित केलेले दिसते

तमिळ साहित्य संघाचे दुसरे महत्त्वाचे कार्य म्हणजे तोलकाप्पियम हे तमिळ भाषेचे व्याकरण होय. याचे लिखाण दुसऱ्या व तिसऱ्या संघ काळात झाले. याचे तीन अधिकार म्हणजे खंड आहेत. पहिल्या खंडास एळुत्ततिकारम् असे म्हणतात. यात प्राचीन तमिळच्या ध्वनिपद्धतीचे विश्लेषण आहे. दुसऱ्या खंडास चोल्लति-कारम् अशी संज्ञा असून त्यात तमिळ भाषेच्या रूपरचनेचा व वाक्यरचनेचा विचार केलेला आहे. तिसऱ्या खंडास पोरुळतिकारम् म्हणतात. यात अलंकार व वृत्तांसंबंधी माहिती आलेली आहे या व्याकरणात एकूण १६७६ सूत्रे असून याचा कर्ता कोणी जैन पंडित असावा हा मोठा व्युत्पन्न व शास्त्रीय दृष्टिकोन बाळगणारा दिसतो. परभाषेतून येऊन स्थिर झालेले शब्द भाषेचे अंग गणावे व त्यांचा व्याकरणात समावेश करावा, असे हा सांगतो.

तमिळ साहित्याच्या इतिहासात सातव्या शतकापासून पुढील अडीचशे वर्षांचा काळ हा भक्तिकाव्याचा होय. या काळातील शिवभक्त म्हणजे नायनार व विष्णुभक्त म्हणजे अळवार या दोन पंथांतील साधूंनी लिहिलेले काव्य भक्तिरसाने ओथंबलेले आहे. भक्तिकाव्याबरोबरच कर्मठ सनातनी नीतिकाव्यही लिहीत होतेच. या काळापासून रामायण, महाभारत, बृहत्कथा, इ. संस्कृत ग्रंथांची रूपांतरे तमिळमध्ये होऊ लागली; व याचे बरेचसे श्रेय जैन कवींकडे जाते.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दहाव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत रामानुज, वेदांतदेशिक, मनवलमहामुनी, इ० वैष्णव पंडितांनी संस्कृत भाषेत बरेचसे धार्मिक व तत्त्वज्ञानविषयक लिखाण केलेले दिसते. मेयकंददेव, अरुलनंदी शिवाचार्य, उमापति शिवाचार्य इ० शैव पंडितांनीही संस्कृतप्रचुर तमिळमध्ये धार्मिक लिखाण केलेले आढळते. या काळात व नंतर तमिळवर संस्कृतचा मोठा प्रभाव दिसून येतो, अनेक संस्कृत तत्सम शब्दांनी तमिळ भाषेत शिरकाव केला व अनेकांनी तद्भव रूपे धारण केली. तद्भव शब्दांत तमिळ भाषा-विशेषानुसार बदल झालेला आढळतो. उदा० 'लोक' या संस्कृत शब्दाचे 'उलगु' असे रूप झाले. 'राजा' याचे 'अरसु' झाले. यापूर्वीही काही संस्कृत तत्सम अथवा तद्भव शब्द तमिळ भाषेत प्रविष्ट झाले होते. तीर्थाटणे, व्यापारउदीम, शास्त्रचर्चा या हेतूने उत्तर व दक्षिणेचा सतत संपर्क असे. यामुळे ब्राह्मण, पंडित, ज्योतिषी पुरोहित वगैरे वर्गांच्या संपर्काने अनेक संस्कृत शब्द या भाषेत आले. उदा० संस्कृत 'श्री'चे 'तिरु' 'कर्मन्'चे 'करुमम्' अथवा 'कन्मम्' अशी रूपे झाली. तमिळ महिन्यांची नावे संस्कृत नावांपासून बनलेली आढळतात. उदा० पूर्व आषाढ'पासून 'पुराडम्' 'पूर्व भाद्रपद' पासून 'पुरट्टासी' अशी रूपे झालेली दिसतात.

जैन व बौद्ध वर्चस्वाखाली असलेल्या तमिळ साहित्याने व भाषेने अठराव्या शतकात नवीन वळण घेतले. उर्दू व इंग्रजीचा पगडा वाढला, इंग्रजी ग्रंथांची भाषांतरे होऊ लागली. याच काळात वेदनायकम् पिल्ले यांची प्रताप मुदलियार चरित्तिरम्, राजम् अय्यर यांची कमलाम्बाल चरित्रम् या कादंबऱ्या बाहेर पडल्या १८३१ साली तमिळ मॅगझिन नावाचे पहिले वर्तमानपत्र निघाले. १८५६ पासून दिनवार्तामणी हे दैनिक चालू झाले. १८७० पासून प्रसिद्ध होणारे जनविनोदिनी हे पहिले तमिळ मासिक होय.

आधुनिक काळात सुंदरम पिल्लै कृष्ण पिल्लै व सुब्रह्मण्य भारती यांचे काव्य विशेष गाजले. सुब्रह्मण्य भारती यांनी राष्ट्रीय भावनेची जोपासना करणारे काव्य लिहून एक परंपराच निर्माण केली. या परंपरेतील कवी म्हणून भारती दासन, देशिक विनायकम पिल्लै, शुद्धानंद भारती इत्यादींचा उल्लेख करता येईल. नाट्यक्षेत्रात श्री संबध मुदलियार यांचे नाव प्रामुख्याने पुढे येते. यांनी ८० हून अधिक नाटके लिहिली. वडुवुर दुरैस्वामी अय्यंगार आणि रंगराज यांच्या सामाजिक कादंबऱ्या व रा. कृष्णमूर्ती यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या विशेष लोकप्रिय आहेत. कादंबरीकारांत कण्णन, जीवा, महादेवन व कथालेखकांत चक्रवर्ती राजगोपालाचारी, पुदुमैपित्तन रंगनाथन, पिच्चमूर्ती


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ही नावे उल्लेखनीय आहेत. लक्ष्मी, गुहप्रियै, सरस्वती अम्माल, अनुत्तमा या लेखिकांचे लेखन विशेष वाचले जाते. सांप्रत कलैमगळ, कावेरी ही मासिके, आनंदविकटन, कलकी, स्वदेशमित्रन आदी साप्ताहिके, व दिनमणी, स्वदेशमित्रन इत्यादी दैनिके अग्रगण्य आहेत.

तमिळ भाषा व साहित्य यांस फार मोठी परंपरा लाभली आहे. नव्या पिढीत या परंपरेचा अभिमान स्वाभाविकरीत्या जागृत झालेला आहे. या स्वाभिमानास आर्थिक व राजकीय कारणांची जोड मिळाल्याने संकुचित वृत्तीचा प्रादुर्भाव होऊन अन्य राज्यांशी सहकार व सामंजस्य कमी होत चालले आहे.

इंग्रजीचे उच्चाटण करून हिंदीला तिचे स्थान प्राप्त करून देण्यात प्रमुख विरोध तमिळ भाषिकांचा आहे. ३ कोटी ५ लक्ष तमिळ भाषिकांपैकी १२ लक्ष ६१ हजार लोकांनी इंग्रजी ही आपली दुय्यम भाषा नोंदविली आहे तर हिंदी फक्त ९८ हजार व उर्दू ४२ हजार जणांनीच नोंदविली आहे. तमिळ भाषिकांना द्राविड परिवारातील भाषांची मोठ्या प्रमाणावर जाण दिसते. तेलुगु जाणणारे ५ लक्ष ८२ हजार, कन्नड जाणणारे २ लक्ष ८४ हजार व मलयाळम् जाणणारे १ लक्ष ५१ हजार लोक आहेत. मराठी जाणणारे एकूण १० हजारच लोक आहेत! भारतीय एकता वाढीस लावण्याच्या हेतूने तमिळ भाषिकांना हिंदी व अन्य आर्यभारतीय भाषा आणि साहित्य यांची गोडी लावण्याची आज नितांत आवश्यकता आहे.

### भाषासु मधुरतमा : तेलुगु

भारतातील क्रमांक दोनची मोठी भाषा तेलुगु होय. हिच्या भाषिकांची संख्या ३ कोटी ७७ लक्ष असून ही सध्याच्या आंध्रप्रदेश राज्यात बोलली जाते. या भाषेचा उल्लेख संस्कृत वाङ्मयात प्राधान्याने आंध्र भाषा असा होई. तेलुगु असा प्रथमोल्लेख मार्कंडेयपुराणात सापडतो. टॉलेमी या ग्रीक इतिहासकाराने उल्लेखिलेली तेलुगु ग्रामनामे अगदी गंगेपर्यंत जाऊन भिडतात, यावरून प्राचीन काळी ही भाषा फार विस्तृत प्रदेशात प्रचलित असावी असे दिसते. तेलुगु शब्दाची व्युत्पत्ति त्रिलिंग या संस्कृत शब्दावरून सांगितली जाते. तेलुगूचे तेनुगु म्हणजे दक्षिण असेही नाव प्रचारात आहे. तेलुगु भाषेवर संस्कृत व प्राकृत भाषांचा फार मोठा प्रभाव आढळतो. वर्णमाला संस्कृत असून हजारो तत्सम व तद्भव शब्द वापरात आहेत. इ. स. दुसऱ्या शतकातील प्राकृत व संस्कृत शिलालेखांतूनही तेलुगुसदृश शब्द आढळतात. तेलुगु व कन्नड या भाषांच्या प्रकृतीतील अतीव साम्य आंध्र व कर्नाटक


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यांमधील घनिष्ठ संबंधाचे निदर्शक आहे. पंप व पोन्न हे प्राचीन तेलगु ग्रंथकार कर्नाटकातीलच होते. प्रारंभी या दोन भाषांसाठी वापरली जाणारी लिपीही एकच होती तेलुगु शब्द स्वरान्त असल्याने ही भाषा ऐकण्यास फार मधुर लागते: या कारणाने हिला 'पूर्वेकडील इटालियन' असे संबोधिले जाते.

भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वावर आधारलेले पहिले राज्य आंध्रप्रदेश होय. मद्रास इलाखा व हैद्राबाद संस्थानातील तेलुगु भाषिकांचा प्रदेश एकत्र आणून हे राज्य निर्माण झाले. तमिळप्रमाणे तेलुगूच्याही अभिजात व व्यावहारिक अशा दोन शैली आहेत. अभिजात तेलुगु साहित्यिक लिखाणासाठी वापरली जात असून ती व्यावहारिक बोलभाषेपासून फार वेगळी व पुरातन आहे. व्यावहारिक तेलगूचे तीन प्रमुख प्रादेशिक भेद आहेत. यांतील पहिली बोली पूर्वेकडील सागरी जिल्ह्यात बोलली जात असून हिला प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. प्रमाण तेलुगु म्हणून हिची गणना करता येईल. दुसरी बोली तेलंगणात बोलली जाते. हिच्यावर उर्दूचा मोठा प्रभाव आहे. नैऋत्येकडील रायलसीमा विभागात बोलली जाणारी ग्रामीण बोली हा तेलुगुचा तिसरा प्रादेशिक भेद होय. हे भेद खालील उदाहरणावरून स्पष्ट होतील.

'त्याने केले'

ग्रांथिक : चेसेनु

सागरी : चेश्शॅडु

तेलंगणी : चेसिण्डु

रायलसीमी : चेसिनाडु

तेलुगु साहित्याचा प्रारंभ नन्नयभट्टाच्या (१०१९–१०६१) महाभारताने होतो. तेराव्या शतकात रंगनाथाचे द्विपाद रामायण व तिक्कन्न याज्वीचे निर्वचनोत्तर रामायण हे प्रमुख ग्रंथ तयार झाले. पुढे प्रत्येक शतकात एकतरी रामायण ग्रंथ निर्माण झालेला दिसतो. या जवळजवळ पाचशे वर्षांच्या काळात संस्कृतमधील महत्त्वाच्या सर्व ग्रंथाची तेलुगूत रूपांतरे किंवा भाषांतरे झाली आणि संस्कृतच्या धर्तीवर पुराणे, प्रबंध, शतककाव्ये, क्षेत्रमाहात्म्ये, यक्षगान, उदाहरण, चाटुपद्य, इ० साहित्यप्रकार रूढ झाले. याशिवाय धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, व्याकरण, अलंकारशास्त्र, राजकारण, इ० विषयांवरील ग्रंथांचे आदर्शही संस्कृत साहित्यातीलच होत. नन्नय, तिक्कन्न, सोमन, श्रीनाथ, पेद्दन, सूरन, रामराजभूषण इ० कवींनी तेलुगु सारस्वतास वैभवास आणले.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एकोणिसाव्या शतकापासून इंग्रजीच्या प्रभावाने तेलुगु साहित्यास नवे उन्मेष फुटून कथा, कादंबऱ्या, नाटके, भावकविता, इ० क्षेत्रात ही भाषा दिमाखाने वावरू लागली आहे विश्वनाथ सत्यनारायण, श्रीश्री, दाशरथी, आरुद्र, नंदी आरिकेपूडि कौसल्यादेवी इ. नामवंत कवी कथाकार, नाटककार, कादंबरीकार आपल्या नवनवीन आविष्कारांनी तिला संपन्न करीत आहेत. आंध्रप्रभा, आंध्रपात्रिका, आंध्रज्योति यांसारखी दैनिके व साप्ताहिके, युवा, ज्योति, भारती यांसारखी मासिके तेलुगूला नवे, सर्वस्पर्शी व सर्वग्राही रूप देण्यात दंग आहेत.

महाराष्ट्राचा व आंध्रचा संबंध फार प्राचीन काळापासून निकटचा आहे. कोमटी, वडार, बेडर, कामाठी, इ. तेलुगु भाषिकांच्या जमाती महाराष्ट्रात येऊन स्थायिक झाल्या आहेत. नायक, नायडू, रेड्डी व आडनावांच्या शेवटी '-वार' प्रत्यय असलेली सध्याची महाराष्ट्रीय मंडळी मुळात आंध्रप्रदेशमधीलच होत. ज्ञानेश्वरीत बुरि, उबर, एकवंकी, जकलिले हे तेलुगु शब्द आढळतात. चौदाव्या शतकात सतत ऐंशी वर्षे पडलेल्या दुर्गादेवीच्या भीषण दुष्काळात उभा महाराष्ट्र देशोधडीला लागला. त्यावेळी अनेक महाराष्ट्रीय कुटुंबे आंध्रमध्ये आश्रयाला गेली. येताना त्यांनी नवनवे शब्द, वाकप्रचार, गीते व सामाजिक चालीरीती आपणाबरोबर आणल्या. विटीदांडूच्या खेळातील 'वकट, रेंड, मूंड,' इ. शब्द तेलुगूच आहेत. गोवळकोंड्याच्या मुसलमान राज्यकर्त्यांच्या हाताखाली अनेक मराठे सरदार नोकरीस असल्याने त्यांच्या शासनपत्रांतून अनेक मराठी शब्द आढळतात कुलकर्णी, देशपांडे, देशमख, इ. ग्रामसेवकांची पदे, व नावांनंतर लागणारे राव, पंतुलु, जी हे प्रत्यय मराठीनेच तेलुगूला दिले. मराठी जाणणाऱ्या तेलुगु भाषिकांची एकूण संख्या खूपच मोठी, म्हणजे २ लक्ष ४३ हजार एवढी आहे.

आंध्रप्रदेशातील लोक मोठ्या प्रमाणावर बहुभाषिक आहेत. तमिळ ही १३ लक्ष २७ हजार तेलुगु भाषिकांची दुय्यम भाषा आहे; तर कन्नड १० लक्ष ५५ हजारांची आहे. इंग्रजीचे जाणकार ८ लक्ष ५५ हजार: तर हिंदीचे ३ लक्ष २८ हजार आहेत. पूर्वीच्या हैद्राबाद संस्थानात मुस्लिम वस्ती फार असल्याने तेलुगु ही १० लक्षांवर उर्दू भाषिकांची दुय्यम भाषा आहे; तर २ लक्ष ९२ हजार तेलुगु भाषिक उर्दू जाणतात.

कर्णाटका: टंकारोत्तरपाठिन:

धनुष्याच्या प्रत्यंचेमधून निघणाऱ्या टणत्काराच्या धीरगंभीर स्वरात गायली जाणारी भाषा म्हणून कन्नड ही विख्यात आहे. हिच्या भाषिकांची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संख्या १ कोटी ७४ लक्ष असून ती सध्याच्या कर्नाटक राज्यात बोलली जाते. भौगोलिकदृष्टया कन्नडच्या तीन प्रमुख बोली आढळून येतात. म्हैसूर केंद्र धरून आजूबाजूच्या जिल्ह्यांत बोलली जाणारी दक्षिण बोली, धारवाड केंद्र धरून उत्तरेकडील जिल्ह्यांत बोलली जाणारी उत्तर बोली, व मंगळूर केंद्र धरून किनारपट्टीच्या प्रदेशात बोलली जाणारी सागरी बोली, या तीन बोलीत कन्नड विभागली आहे. दक्षिणेकडील बोलीवर तमिळचा, उत्तरेकडील बोलीवर मराठी व उर्दूचा, आणि सागरी बोलीवर कोकणीचा प्रभाव दिसून येतो. सागरी बोलीचे गौडा, हव्याका, हालक्की इ० भेद आहेत. अन्य बोलीत ब्राह्मण–ब्राह्मणेतरांच्या बोलण्यातही खूप फरक आढळतो. या शिवाय बडगा, सोलिगा यांसारख्या आदिवासी कन्नड बोलीही आहेतच.

कन्नड भाषेची प्रकृती तमिळ, मलयाळम यांच्याशी नाते सांगणारी आहे; परंतु लिपीचे साधर्म्य तेलुगु लिपीशी आहे. साधारणतः सहाव्या शतकापासून कन्नड शिलालेख सापडतात नवव्या शतकापासून साहित्यनिर्मिती आढळते. या भाषेतील प्राचीनतम उपलब्ध ग्रंथ म्हणजे राष्ट्रकूट वंशातील राजा नृपतुंग याचा कविराजमार्ग हा लक्षणग्रंथ होय. नृपतुंगाने कन्नड भाषेचा प्रदेश गोदावरीपासून कावेरीपर्यंत पसरलेला आहे, असे सांगितले आहे. त्याने आपल्या ग्रंथात काही प्राचीन कन्नड कवींचा उल्लेख केलेला असून त्यांची काही पदेही संग्रहित केलेली आहेत. यावरून कन्नड भाषेतील लेखनास नृपतुंगापूर्वीही प्रारंभ झाला असावा असे दिसते.

प्रारंभीचे कन्नड काव्य जैन, ब्राह्मण, वीरशैव, इ० पंथांच्या अनुयायांनी लिहिलेले असून त्याचे स्वरूप धार्मिक आहे. पंपाचे आदिपुराण आणि भारत ( इ. स. ९४२ ), रन्नाचे अजित तीर्थंकर हे पुराण व गदायुद्ध ( इ. स. ९९२ ) हे महाकाव्य, गंग राजांचा सचीव चावुण्डराय याचे चावण्डपुराण हा गद्यकाव्य ग्रंथ, शिवकोटयाचार्यांचे वोड्डाराधण, नागवर्म्याने केलेला बाणाच्या कादंबरीचा अनुवाद, इ० या काळातील कृती उठून दिसतात. रामायण व महाभारतातील उत्तर भारतीय कथा व कर्नाटकातील त्यांचे स्वरूप यात फरक जाणवतो. पंपाच्या भारतात द्रौपदीस पाच पती नाहीत. अर्जुन हाच भारताचा नायक असून, श्रीकृष्णास दुय्यम स्थान आहे. नागचंद्राच्या रामायणात रावण हा धर्मशील दाखविलेला असून, त्यात पुत्रकामेष्टी यज्ञ, विश्वामित्र, वसिष्ठ यांचा मागमूसही नाही. रावणवधाचे काम लक्ष्मणावर सोपवलेले असून हनुमानास विमानाने लंकेस पाठविलेले आहे !



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बाराव्या शतकापर्यंतच्या या काव्यनिर्मितिकालास पंपयुग अशी संज्ञा आहे. या युगातील काव्यावर संस्कृत भाषा व काव्यकल्पनांचा प्रभाव दिसून येतो. या नंतरच्या काळात नवनवीन छंदांची भर पडून भक्तिकाव्य तालासुरावर उच्चरवाने गाण्यास प्रारंभ झाला. या काळातील बसवेश्वराचे वचनसाहित्य व बसवपुराण लिंगायतांत आजही शिरोधार्य मानले जाते. मराठीतील श्रीधराचे रामविजय हरिविजय, पांडवप्रताप व शिवलीलामृत हे ग्रंथ जसे घरोघर वाचले जातात, तसेच कन्नडमधील कुमार व्यासाचे भारत व लक्ष्मीशाचे जैमिनी भारत घरोघर घडाघड वाचले जाते व कर्णाटका. टंकारोत्तरपाठिन: या उक्तीची सार्थता पटते. कर्नाटक संगीताचे आद्याचार्य पुरंदरदास सोळाव्या शतकात होऊन गेले. त्यांनी लिहिलेली विविध रागांतील भक्तिगीते अत्यंत लोकप्रिय आहेत. याच काळात विजयनगरच्या साम्राज्याचा नाश होऊन कन्नड साहित्यास उतरती कळा लागली.

विसाव्या शतकात कन्नड साहित्याचे पुनरुज्जीवन झालेले दिसते. या काळात पुट्टण्ण, वासुदेवाचार्य, कारंत, अ. न. कृष्णराय यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या. वेंकटाचार्यांने बंकिमचंद्रांच्या कादंबऱ्या अनुवादित केल्या; तर गलगनाथाने मराठी कादंबऱ्यांचे अनुवाद केले. मास्ती यांच्या कथा, बेंद्रे यांचे आध्यात्मिक काव्य, पुट्टपांचे वीरकाव्य, पु. ति. नरसिंहाचार्य यांचे भावकाव्य, त्याचप्रमाणे कैलासगम, पर्वतवाणी, क्षीरसागर, कस्तुरी यांची नाटके या काळाची प्रातिनिधिक होत.

कर्नाटक एकसूत्री सत्तेखाली कधीच नसल्याने ( सध्या आहे ! ) कन्नड भाषेवर तमिळ, तेलुगु, तुळु, मलयाळम, उर्दू, मराठी, कोकणी या भाषांचा परिणाम फार दिसतो. उदाहरणार्थ, सध्याच्या कर्नाटक राज्यातील बिदर जिल्हा पूर्वी हैद्राबाद संस्थानात मोडत असे. या जिल्ह्यातील कन्नडच्या प्रकृती व शब्दसंग्रहावर मराठी व उर्दू या भाषांनी आक्रमण केलेले आढळते. उर्दू धातूंस '– सु' हा कन्नड प्रत्यय लावून हालायसु, गुजरायसु, रुकायसु, ठकासु अशी क्रियारूपे किंवा '– माडु' हा परसर्ग लावून खराबमाडु ( बिघडणे ), निकालमाडु ( हाकलणे ), साफमाडु ( स्वच्छ करणे ), खतलमाडू ( कत्तल करणे ) अशी संयुक्तरूपे तयार होतात. वाक्यरचनेतही हा प्रभाव प्रकर्षाने जाणवतो. जसे, – जरा हळ्ळग बाप्प 'हळू चाल,' नम पार तीन फेकि नापास आग्यन 'माझा मुलगा तीनदा नापास झाला,' अवरु एकदम साचा हर 'तो फार प्रामाणिक आहे,' इ०


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ज्याप्रमाणे कन्नड भाषेवर अन्य भाषांचा परिणाम झाला आहे, त्याप्रमाणेच अन्य भाषांवरही कन्नडचा प्रभाव दिसून येतो. कारवारपासून कासरगोड-पर्यंतच्या सागरपट्टीत बोलल्या जाणाऱ्या कोकणीच्या ध्वनिपद्धतीवर कन्नडचा विशेष परिणाम झाला आहे. वेंगुर्ल्यापासून काणकोणपर्यंतच्या कोकणीमध्ये स्वरांची दीर्घता अर्थबदलास कारणीभूत होत नाही, परंतु एकदा सदाशिवगडची खाडी ओलांडली की कोकणीची ध्वनीपद्धती बदललेली दिसते. स्वरांची ऱ्हस्वदीर्घता अर्थबदलास कारणीभूत होते, एवढच नव्हे तर अतिदक्षिणेकडे ऱ्हस्व व दीर्घ मिळून एकूण १८ स्वर असलेले दिसतात.

यादवकाळात किंवा त्यापूर्वीही मराठी-कानडी संबंध घनिष्ठ होता. ज्ञानेश्वरी व अमृतानुभवात अडदर, किडाळ, बरडी, बोबरी, तूप, मिरवती, इ० कन्नड शब्द आहेत. या काळातील कोरीव लेखांतून आण्णय्य, एल्लुबाई, गरजेया इ० कन्नड व्यक्तिनामे येतात. कृष्णदेव यादवाच्या तासगाव ताम्रपटात (इ. स. १२५१) ओडेर, ओडेरी, हे कन्नड शब्द आढळतात. बीरसत्याश्रयदेव चालुक्याच्या मिरज ताम्रपटात (इ. स. ११५४) बेलुवलिके, मदकुणिके, नलवीडिनलु, इ० कानडी वळणाचे शब्द येतात. पंढरपूरजवळ पुळुंज गावी, संगळवेढे व तेर येथे कन्नड शिलालेख सापडले आहेत. याउलट राणेबेन्नुर (इ. स. १२५२) व बिजापूर (इ. स. १३२०) येथे मराठी शिलालेख सापडले आहेत. महाराष्ट्र-कर्नाटक सीमेवरील मोठा प्रदेश त्या काळीही द्वैभाषिक असल्याचे हे द्योतक आहे. आजही मराठी व्यवहारात अनेक कन्नड शब्द प्रचलित आहेत. उदा. युद्धासंबंधी : कोट तोफ; व्यापारासंबंधी : तराजू, दर, मण, रोख, शेर; दागिने : नथ, सरी, पाटली; खाद्ये : कडबोळी, चुरमुरे, पोळी, फुटाणे; इतर : रेशीम, टपाल, टांगा, शिंपी, गुंडी, बंडी, एळकोट, होळी, अक्का, आप्पा, काका, हुंडा, झारा, ओगराळे, परात, पातेले, इ.

सांप्रत मराठी जाणणाऱ्या कन्नड भाषिकांची संख्या फार मोठी, म्हणजे ४ लक्ष ५९ हजार एवढी आहे. तेलुगु जाणणारे ७ लक्ष ७४ हजार तर तमिळ जाणणारे ५ लक्ष ६१ हजार एवढे आहेत. इंग्रजी व हिंदी जाणणारी पुरुष मंडळी पुष्कळ आहेत, (इंग्रजी : पुरुष २ लक्ष ६८ हजार; स्त्रिया ५९ हजार. हिंदी : पुरुष १ लक्ष ४१ हजार; स्त्रिया ३६ हजार) ही गोष्ट कर्नाटकातील स्त्रीवर्ग आधुनिक शिक्षणात मागासलेला असल्याची निदर्शक आहे. उर्दू जाणणारे ८१ हजार, तुळू जाणणारे ७२ हजार, तर कोकणी जाणणारे १५ हजार आहेत. विशेष म्हणजे १३ लक्ष ५२ हजार कोकणी भाषिकांपैकी २ लक्ष ५० हजार कन्नड जाणतात. मराठी जाणणारे फक्त ४६ हजारच आहेत !



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मलयाळम

नितांतरमणीय निसर्गसौंदर्याने नटलेल्या केरळ राज्याची भाषा मलयाळम होय. मलयाळम या शब्दाचा अर्थच मुळी पर्वतमय प्रदेश असा आहे. ही द्राविड परिवारातील सर्वात लहान साहित्यिक भाषा. हिच्या भाषिकांची संख्या ९ कोटी ७ लक्ष एवढी आहे केरळाबाहेर लक्षद्वीपातही ( लखदीव बेटे ) मलयाळम बोलली जाते. स्वातंत्र्यपूर्व काळातील त्रावणकोर, कोचीन आदी संस्थानांचे केरळ हे राज्य बनलेले असून विभिन्न चालीरीतींच्या अनेक समाजांची यात वस्ती आहे वस्तुतः मलयाळम ही अनेक विभिन्न बोलींचा समुदाय आहे, त्यांतील मलबारी, नायर, कयबार ह्या प्रमुख होत. मुथुवन, कादर ह्या आदिवासी समाजाच्या बोली आहेत. अरब खलाशी व केरळीय प्रजा यांच्या संबंधातून निर्माण झालेल्या मापिला या समाजाची बोलीही वैशिष्टयपूर्ण आहे.

प्रारंभी मलयाळम ही तमिळ भाषची एक बोली होती. नवव्या शतकापासून हिला स्वतंत्र अस्तित्व प्राप्त होऊन ही वेगळी भाषा गणली जाऊ लागली. ह्या भाषेवर संस्कृतचा अतिशय पगडा असून जवळजवळ अठ्ठावन्न टक्के शब्दसंग्रह संस्कृत तत्सम व तद्भव स्वरूपाचा आहे. संस्कृतचा प्रादुर्भाव झाल्यावर पूर्वीच्या वट्टेझुत्तु या तमिळ लिपीचा त्याग करून, तीमध्ये सुधारणा केलेली मलयाळम लिपी वापरात येऊ लागली. मापिल्यांनी मात्र संस्कृतचा वापर टाळून वट्टेझुत्तु लिपी राबविली. पुढे अरबी भाषेचा व लिपीचा आश्रय केला.

मलयाळम भाषेत अभिजात साहित्य फारच थोडया प्रमाणावर निर्माण झाले. प्रारंभीचे साहित्य वीरगाथांच्या स्वरूपातील असून अस्सल मलयाळम ग्रामीण काव्य म्हणून त्याकडे पाहता येईल. त्रावणकोरचा राजा रामवर्मा याने लिहिलेले रामचरित हे युद्धकांडावर आधारलेले काव्य ही उपलब्ध अशी पहिली साहित्यकृती आहे. हा काळ बाराव्या तेराव्या शतकातील होय. याच काळात माधवाने भगवद्गीतेचा व राम पणिक्करने रामायण, भारत, भागवत आदी ग्रंथांचा अनुवाद केला. संस्कृत टाळून शुद्ध मलयाळम भाषेत लेखन करण्याचा प्रयत्न या ग्रंथांतून दिसून येतो. या शैलीस पाट्टु म्हणजे गीतशैली असे म्हणतात. नंबुद्री ब्राह्मणांच्या संस्कृत प्रेमाने व व्यासंगाने संस्कृतप्रचुर लेखन करण्याची प्रवृत्ती पुनः पंधराव्या शतकात रूढ झाली. या शैलीला मणिप्रवाल शैली अशी संज्ञा आहे. तेरा ते पंधरा या शतकांत मलयाळमच्या प्रकृतीतही बराच फरक झाला. याच काळात क्रियापदांना लागणारे पुरुषवाचक प्रत्यय नाहीसे झाले. संस्कृतच्या प्रभावाने व अनुकरणाने चंपू, खंडकाव्य, नाटक,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लक्षणग्रंथ, इ० अनेक साहित्यप्रकार नंतरच्या कवींनी हाताळले. यांतील भक्तकवी तुंचत रामानुजाचार्य यांचे रामायण, महाभारत, भागवतावरील ग्रंथ फार लोकप्रिय असून मोठ्या आवडीने वाचले जातात. केरळातील कथकली नृत्य साहित्य, संगीत व अभिनय या तिन्ही दृष्टींनी उच्च प्रतीचे आहे. या नृत्यांची गीते कोट्टारक्करा राजा कोट्टयम राजा, उण्णयी वारियर, इरयम्मन तम्पी, इ. कवींनी लिहिली आहेत.

इतर भारतीय भाषांप्रमाणे एकोणिसाव्या शतकात मलयाळममध्येही क्रांतिकारक साहित्य निर्माण झाले. महाकवी कुमारन आशन हे या भाषेचे केशवसुत होत, तर चङम्पुम हे मर्ढेकर होत. सांप्रत सि. वि. रामन पिल्ले, चन्दु मेनन, अप्पन तम्पुरान हे कादंबरीकार, आणि तकषा, केशवदेव, पोट्टेकार हे कथाकार अग्रगण्य आहेत.

केरळ हे शैक्षणिकदृष्टचा प्रगतिशील राज्य असून येथे इंग्रजी ही फार मोठ्या प्रमाणावर दुय्यम भाषा आहे. ७ लक्ष ६२ हजार लोक इंग्रजी जाणतात; त्या खालोखाल १ लक्ष ६७ हजार तमिळ जाणणारे आहेत. हिंदी जाणणारे ८० हजार, तर अरबी जाणणारे ३४ हजार आहेत.

## दक्षिण भारतीय लिप्या : उद्गम व विकास

भारताचा दक्षिण विभाग अवाढव्य शिल्पे, भव्य मंदिरे, मूर्ती, लेणी, स्तंभ यांप्रमाणेच शिलालेख, ताम्रपट, मुद्रा, नाणी, इ. प्राचीन ऐतिहासिक साधनांनी गजबजलेला आहे. ताडपत्रावर लिहिलेले हजारो संस्कृत, तमिळ, मलयाळम, तेलुगु, कन्नड भाषांतील ग्रंथ आज अभ्यासकांना उपलब्ध आहेत, लेखनासाठी वापरलेल्या साहित्याचा लिपीच्या स्वरूपावर काय परिणाम होतो, याचा अनुभव आपणास या प्रदेशातील लिप्यांचा अभ्यास करताना येतो. कोरीव लेख हे सामान्यतः दगडावर खोदावयाचे असल्याने त्यांना वक्र रेषा व वळणांचे वावडे असते. चौकोनी, त्रिकोणी, उभ्या-आडव्यासरळ रेषांची अक्षरे खोदकामास सोयिस्कर असतात. याच्या अगदी उलट ताडपत्रीवरील लिखाणाचे होय. सरळ शिरोरेषा व दंड यांनी ताडपत्रांच्या शिरा मोकळ्या होऊन सळईने अशी अक्षरे कोरणे कठीण होऊन बसते. पुढे ही ताडपत्रे फाटत जाऊन त्यांचे आयुष्य कमी होते. दक्षिणेकडील अर्वाचीन लिप्यांच्या वेलबुट्टीदार वळणांचे रहस्य ताडपत्राच्या या नैसर्गिक प्रवृत्तीत आहे.

दक्षिण भारतातील सर्व लिप्या ब्राह्मीमधून उत्क्रांत झाल्या आहेत. ब्राह्मी भारताची प्राचीन राष्ट्रीय लिपी होय. आज आसेतुहिमाचल भारतीय


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रदेशात वापरात असलेल्या सर्व लिप्या ब्राह्मीतून नैसर्गिकरीत्या उत्क्रांत पावल्या आहेत. भाषेप्रमाणे पिढ्यापिढ्यांच्या हस्तांतरांतून लिप्याही वेगळे वळण घेत असतात. शतकाशतकाच्या टप्प्यावर ब्राह्मीने नवीन वळण धारण केलेले दिसून येते. इ. स. पू. तिसऱ्या शतकातील अशोकन ब्राह्मीचे इ. स. पू. दुसऱ्या शतकात शुंग ब्राह्मी, इ. स. पहिल्या शतकात कुषाण ब्राह्मी, तर इ. स. चौथ्या पाचव्या शतकात गुप्त लिपीची अवस्थांतरे पुढे शारदा, नागरी, कुटील, गौडी, सिद्धमातृका या शैलींत होऊन त्यांतून आजच्या उत्तर भारतीय लिप्या निर्माण झाल्या.

दक्षिण तामिळनाडूत सापडलेले काही शिलालेख इ. स. पू. दुसऱ्या व तिसऱ्या शतकातील आहेत. या शिलालेखांतून व अरिकमेडु येथे सापडलेल्या मडक्यांवरील चिन्हांतून प्राचीन ब्राह्मीचे दक्षिणेकडील स्वरूप स्पष्ट होते. प्रारंभीचे तमिळ शिलालेख ब्राह्मीत आहेत. हिला दक्षिण ब्राह्मी म्हणता येईल. या लिपीत विशिष्ट तमिळ ध्वनींसाठी वेगळी चिन्हे होती. उदा० वर्त्स्य 'त' आणि 'न' साठी दंत्य 'त न' वा मूर्धन्य 'टण' यांहून वेगळी चिन्हे वापरात होती. विशिष्ट 'ळ' ध्वनी (सघोष 'ष') तसेच ऱ्हस्व व दीर्घ 'ए ओ' यांसाठीही वेगळी चिन्हे होती.

दक्षिण ब्राह्मीपासून ग्रंथ, तमिळ व मलयाळम या प्रमुख लिप्या उत्क्रांत झालेल्या दिसतात. ग्रंथ ही साहित्यिक लिखाणाची लिपी होती. प्राचीन काळी दक्षिणेत शिलालेख व ताडपत्रावरील संस्कृत ग्रंथांच्या लेखनासाठी हिचा वापर होई. नवव्या शतकात हिची एक सोपी शैली केरळपर्यंत पोहोचलेली दिसते. आधुनिक मलयाळम लिपीचा उगम या शैलीत आहे. दक्षिण ब्राह्मीतून उत्क्रांत झालेली दुसरी लिपी म्हणजे वट्टेझुत्तु किंवा वर्तुळाक्षर लिपी ही होय. पांड्यांच्या प्रदेशातील प्राचीनतम शिलालेख याच लिपीत आहेत. ही लिपी वैशिष्ट्यपूर्ण अशा तमिळ ध्वनींच्या लेखनास योग्य अशी होती. तिच्यात महाप्राणयुक्त व्यंजनासाठी वेगळे चिन्ह नव्हते. त्याचप्रमाणे वर्गीय मृदु व कठोर व्यंजनांचा फरकही दाखविला जात नसे; आठव्या शतकापर्यंत ग्रंथ व वट्टेझुत्तु या दोन्ही लिप्या जोडीने वापरात होत्या. हळूहळू वट्टेझुत्तु मागे पडून अकराव्या शतकात तिची जागा तमिळ ग्रंथ लिपीने घेतली. या काळापर्यंत दक्षिणेत संस्कृतचा वाढता प्रभाव होता. मलयाळम व तेलुगु-कन्नड लिप्या तर संस्कृत वर्णाक्षरांवरून तयार झाल्या, परंतु तमिळमध्ये मात्र अजूनही कखगघ, तथदध अशा वर्गीय व्यंजनांसाठी वर्गवार एकेकच चिन्ह होते. पुढे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अठराव्या शतकात मिशनऱ्यांनी या लिपीत अनेक सुधारणा घडवून आणल्या. उदा० स्वरविहित व्यंजनावर पुळ्ळी म्हणजे बिंदू देणे, इ०.

पंधरावे शतक उजाडले तेव्हा वट्टेझुत्तु तमिळनाडमधून नाहीशी झालेली होती. केरळमध्ये पुढे ती दोन शतके जिवंत राहिली अठराव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत ती चेर प्रदेशात फक्त हस्तलिखित ग्रंथांसाठी वापरात होती. केरळात वट्टेझुत्तुची जागा कोल एझुत्तु या लिपीने घेतली. महाराजा राजराज याने हिचा फार प्रचार केला व पल्लव-चोलांच्या कारकीर्दीत हिला चांगलीच मान्यता मिळाली. नागमोडी वट्टेझुत्तूपेक्षा ही लिहिण्यावाचण्यास सोपी होती. अलीअलीकडेपर्यंत केरळातील मापिला लोक ही लिपी वापरीत असत; परंतु सांप्रत तिची जागा सुधारित अरबी लिपीने घेतली आहे. मलयाळम भाषा लिहिण्यासाठी मात्र ग्रंथ लिपीपासून उत्क्रांत पावलेली मलयाळम लिपी प्रचारात आहे.

दक्षिणेतील आणखी दोन प्रमुख लिप्या म्हणजे तेलुगु व कन्नड या होत. दक्षिण ब्राह्मीच्या आंध्र व कर्नाटकात प्रचलित असलेल्या शैलीचे उत्क्रांत स्वरूप म्हणजे प्राचीन तेलुगु-कन्नड लिपी होय. बनवासीचे कदंब, बदामीचे चालुक्य, शालंकायन, वेंगीचे चालुक्य यांचे शिलालेख या लिपीत कोरलेले आढळतात. साधारणतः पाचव्या शतकापासून या लिपीचे स्वरूप स्पष्ट होते. बदामीच्या वैष्णव लेण्यातील चालुक्य मंगलेशाचा ( इ. स. ५९८-६१० ) शिलालेख हा या लिपीतील प्राचीनतम कन्नड लेख गणता येईल. या लिपीतील तेलुगु भाषेतील प्राचीनतम शिलालेख आंध्रमधील अनंतपूर व कडाप्पा जिल्ह्यांत सापडतात. त्यांचा काळ सहावे ते आठवे शतक येतो. अकरापासून तेराव्या शतकापर्यंत तेलुगु व कन्नड या लिप्यांनी वेगवेगळी वळणे घेतली व त्या भिन्न लिप्या झाल्या. मुद्रणाचा प्रारंभ झाल्यापासून या लिप्यांचे प्रमाणीकरण झाले. आज तेलुगु व कन्नड यांपैकी एक लिपी जाणणारास त्यांपैकी दुसरी विनासायास वाचता येते.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




प्रतापशा ( ज्येष्ठ पुत्र) — पुरशा

( शके १२२५ ते १२३२ : ७ वर्षे राज्य )

( नागरशाची कन्या याची पत्नी होती )

( एकूण १२५४ पर्यंत लढत झुंजत कारकीर्द म्हणजे यादवाचे राज्य ३८ वर्षे होते. )

प्रतापशा यादवाला त्रिपुरकुमार, केशवदेव, नागरशा यांच्याशी झुंज द्यावी लागली त्यात प्रतापशा पराभूत झाला. रामनगरचे राज्य याचीही एक शाखा इथे फुटते. त्याच्या राखेचा पुत्र देवशा → रामशा अशी ती परंपरा आहे.

( ३ ) नागरशा शके १२३२ च्या सुमारास विजयी.

चेऊलचा दुसरा नागरशा




निकामलिकाशी झालेल्या लढाईत दुसरा नागरशा पराभूत झाला.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(४) शके १२७० पासून तुर्काणांची सत्ता सुरू झाली.

निकामलिक

(याच्यावतीने भागडचुरीने राज्य पाहिले)

लाहूरशा

(दुसऱ्या नागरशाचा हा पुत्र :
शके १२७० ते १२७९ : ९ वर्षे याने राज्य केले)

(५) नायत्यांचे राज्य स्थापन झाले

(शके १२७९ ते १३५१ : ७२ वर्षे कारकीर्द)

(भोंगळे यांच्या दंग्याला सतत २० वर्षे सामना द्यावा लागला.)

(६) जफरखा डफरखा

(अहमदाबादेचा सुलतान अहमदशहाचा हा पुत्र.)

(शके १३५१ ते १३७६ : २५ वर्षे राज्य याने केले)

यानंतर अमलदारांच्या करवी राज्य चालू लागले. बहादूरशहा, अहमदशहा – यांचे राज्य चालू होते, सुस्थिर झाले होते.

(७) महमदशहाबेगडा याची कारकीर्द १३७६ ते शके १४३४ पर्यंत म्हणजे ५८ वर्षे होती, याच काळात फिरंग्यांचा प्रवेश झाला. हिंदु वा मुसलमान धर्म वर्ज्य मानन गोव्याला लोकांची रवानगी करण्यापर्यंत त्यांची मजल गेली. सिनारेदस्कार, बोजिजुझ, कॅप्टन लोरेस, लुईस देताव्न यांची सत्ता बळ धरीत होती.

माहीम प्रांतात झालेल्या परंपरांचा स्वतंत्रपणे अन्वय लावून महिकावतीच्या* बखरीतील राजकीय वंशावळीच्या उकलीचा हा यत्न अभ्यासकांना सहाय्यभूत होईल या अपेक्षेने दिला आहे.



* प्रमुख संदर्भ : महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर : कै. वि. का. राजवाडे. चित्रशाळा (पुणे) शके १८४६.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# बिलेश्वर मंदिराचा शिलालेख

श्री. अ. बा. कुलकर्णी

आमचे वरसोली हे गाव ऐतिहासिक कालापासून प्रसिद्ध आहे. हे गाव कुलाबा जिल्ह्यातील अलिबाग शहरापासून १–१॥ मैल अंतरावर आहे. अशा या वरसोली गावात आमचा वाडा असून त्याच्यापाठीमागे एक प्राचीन पुष्करणी व बेलेश्वर किंवा बिलेश्वर नावाचे जीर्णावस्थेत असलेले शिवमंदिर आहे. मंदिरासमोर नंदी असून त्याच्या पाठीमागे काही अंतरावर ही पुष्करणी आहे. सदर्हू पुष्करणी कुंडाच्या आकृतीची उत्तम बांधलेली असून निमुळत्या पायऱ्या, घाटासारखे लांब सुळके व जागोजागी देवळ्या अशी तिची एकंदरीत रचना आहे. अशा या पुष्करणीच्या समोरील जवळच्या बागेत १४"–१६" आकाराचा १८ ओळीचा पडलेला एक शिलालेख सांपडला. या लेखात बिलेश्वर मंदिराचा तर उल्लेख आहेच परंतु पुष्करणीसंबंधीचा ही मजकूर आढळतो.

या लेखाची शिला साधारण पिवळसर रंगाची असून त्यातील अक्षरे बरीच खोल खोदली आहेत असे वाटते. मात्र जवळच्या खाडीतील खाऱ्या वाऱ्याच्या जोरामुळे व अन्य कारणांमुळे ही अक्षरे पुष्कळच धुपून गेलेली आहेत. लेखाच्या अग्रभागी उजव्या बाजूस एक टवका उडाला असल्याने काही अक्षरे नाहीशी झालेली आहेत. तथापि सर्वसाधारणपणे लेख बऱ्यापैकी सुरक्षित राहिला आहे.

**कालोल्लेख–** प्रस्तुत शिलालेखात ओळ ४ ते १० मध्ये कालविषयक मजकूर आहे. या लेखात शक १०२२ चैत्र शुद्ध १० गुरुवार हा उल्लेख आहे. या दिवशी नवमीचा तिथिक्षय येतो. तथापि इतर योग गणितशास्त्रदृष्टया पाहणे आवश्यक आहेत. परंतु ते पाहिलेले नाहीत. पिल्ले जंत्रीनुसार या लेखाचा दिनांक २२ मार्च इ. स. ११०० येतो यामुळे हा शिलालेख शिलाहार राजवटीत मोडणारा असल्यामुळे याला अनन्य साधारण महत्त्व आहे.

**लेखविषयक–**

लेखाच्या प्रारंभी राजेशास नमन असून शास्त्राची आज्ञा पालन करण्याविषयी सांगण्यात आले आहे. कालविषयक मजकूर विक्रमसंवत अक्षरात दिला असून त्याचवेळी शक १०२२ त उत्तरायण सुरू झाल्यावर चैत्र शुद्ध दशमीस काही विवक्षित योग असता हे बिलेश्वराचे मंदिर वासुदेवाचा मुलगा अर्जुन

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याच्या बायकोने बांधले असल्याचा मजकूर आहे. या बाईचे नाव सुस्पष्ट नाही. परंतु ते बहुधा बरसुम असावे असे वाटते. त्याचप्रमाणे दुसऱ्या दोघानी बिलेश्वराजवळ कुंड तयार करविले अशीसुद्धा माहिती या लेखात आहे मात्र ती नावे नीट वाचता येत नाहीत. लेखाच्या शेवटच्या ओळीत रामजी, कान्होजी, हरी इ. नावे आली आहेत. ती बहुधा कुंड व मंदिर बांधण्याऱ्या शिल्पयांची असावीत असे दिसते.

पाठ– हा पाठ खालीलप्रमाणे आहे :—

१ श्री बिलेश्वर नीन × × × × ×
२ श्री गणेशायनमः श्री × × × × × मप्त
३ पूजा परम्य वेदशास्त्र आज्ञा प्रतिपालना
४ र्थाय ॥ स्वस्ती श्रीनृप विक्रमाद्यप्त मयातिन सका
५ पद वर्षे सके १०२२ प्रविलम्ब उत्तरायने गते श्री सु
६ र्ये दिन्नौ महाम्यगतप्रद चैत्रमासे शुद्ध पक्षे १० द
७ शम्यायां पुण्यतिथौ शुक्रवासरे प्रथमदीशे शुक्ले
८ महायोगे शरे करणे तद्दिने कर्करासी स्थिते चंद्रेस्था
९ त्प स्थे सवितरे फक्कच्छे देव गुरो भुजादिष्टे रवि × ×
१० पक्षे × × × सिद्ध महासये यो स्थानेत्र श्री बिलेश्वर आज्ञा
११ स्थलकेस्य पूर्वेरस्थ तीर्थ मंडल सुरालयं सामान्य ×
१२ आचार्य वासुदेवस्य सुत अर्जुन तस्य भार्या बरसुम कारिता
१३ स नामी पारसुता दोड्डा अद्वितीयको नामोयति
१४ मूलक दिने प्रामाधिपत्यो श्री बिलेश्वर संनिधौ
१५ च्छ कुंडं क्रियते तत्र प्रतिष्ठिता श्री बिलेश्वर
१६ तस्य श्री बिलेश्वर उत्तरे एव कर्ता धीवर न्मम सुध्यते
१७ रामजी कान्होजी हरी × × सवे तथा
१८ महाश्री:

आठव्या ते तेराव्या शतकापर्यंत शिलाहारांचे कोकणावर अधिराज्य होते. या कालातले लेख अनेक ठिकाणी सापडले जात आहेत. इतिहासाची संगति लावण्याच्या दृष्टीने ते महत्त्वाचे आहेत. कुलाबा जिल्ह्यात अक्षी, रानवड व नागाव येथे सापडलेले शिलालेख ही संगति लावण्यास उपयुक्त ठरले आहेत. त्यात हा वरसोलीचा बिलेश्वराचा शिलालेख महत्त्वाची भर घालणारा ठरतो.

◆ ◆ ◆



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## ग्रंथ-परिचय –

## सामान्यांतील असामान्य–

'सामान्यांतील असामान्य' हे महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक यांचे चरित्र आहे. श्री. नाईक सत्तास्थानावर नसताना ते लिहिले गेले आणि प्रकाशात आले हा त्याचा विशेष. वंजारा समाजात जन्मास आलेल्या व स्वकर्तृत्वाने राजपत्रित अधिकारी झालेल्या श्री. पंढरीनाथ पाटील यांनी ते लिहिले आहे. श्री. वसंतराव नाईक हेही याच समाजात जन्मलेले. त्यामुळे त्यांच्याविषयीचा सार्थ अभिमान ही त्यांच्या या चरित्रलेखनामागील प्रेरणा असावी. तथापि आत्मीयतेचा अतिरेक करून विभूतिमत्त्व देण्याचा प्रयत्न मात्र त्यात दिसत नाही. श्री. वसंतराव नाईक यांचे वैयक्तिक आणि कौटुंबिक जीवन त्यांनी ज्या प्रांजलतेने रंगविले त्याचप्रमाणे त्यांचे राजकीय जीवनही रेखाटले आहे. एकप्रकारे हा श्री. नाईक यांचा 'जीवन कार्य-वृत्तांत' आहे श्री. पंढरीनाथ पाटील यांनी ग्रंथरचनेचा केलेला हा पहिलाच प्रयत्न आहे. ते तसे सिद्धहस्त लेखक म्हणून प्रसिद्ध नाहीत एका मागासलेल्या समाजातील आपल्याच सारख्या एका सामान्य माणसाने स्वतःचे व त्याच्या समाजाचे जीवन-चित्र संपूर्णतः कसे बदलून टाकले या भावनेने भारावून जाऊन त्यांचे कर्तृत्व मराठी वाचकांसमोर सामर्थ्याने मांडण्याचा प्रयत्न श्री. पाटील यांनी केला आहे.

प्रारंभीच्या सुमारे वीस पानात श्री. वसंतरावांच्या वैयक्तिक जीवनातील काही प्रमुख घटनांची नोंद लेखकांनी केली आहे. त्यानंतर प्रकरणशः महसूल-उपमंत्री, सहकारमंत्री, कृषिमंत्री, महसूलमंत्री आणि नंतर मुख्यमंत्री या विविध पदांवर असताना घडलेल्या प्रमुख घटना, त्यावेळी त्यांनी केलेले कार्य, त्यावेळी श्री. नाइकांनी केलेली भाषणे यांच्या आधारे चरित्रलेखन झाले आहे. हे सर्व वाचत असताना शासकीय पातळीवरून किंवा वृत्तपत्रांद्वारे वेळोवेळी ज्ञात झालेल्या श्री. वसंतरावजींच्या कार्याचे सतत स्मरण होत राहाते. एकप्रकारे या चरित्रग्रंथाचा बव्हंश भाग म्हणजे श्री. वसंतरावजींच्या शासकीय कारकीर्दीचा आढावा आहे तो एका राजपत्रित अधिकाऱ्याने घेतलेला असल्याने माहितीच्या दृष्टीने तो मोलाचा आहे; परंतु या चरित्रग्रंथाची दोन महत्त्वाची अंगे– ज्यांनी हे चरित्र सर्वार्थाने परिपूर्ण झाले असते– उपेक्षित राहिली आहेत. श्री. वसंतरावजींचे वैयक्तिक, खाजगी जीवन, त्यांतील हर्षामर्षाचे प्रसंग, पिता–पुत्र, बंधु–बंधु पतिपत्नी, मुले यांचे संबंध यांतून त्यांच्या जीवनाची होत गेलेली


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाटचाल अधिक बारकाव्याने सांगण्याची आवश्यकता होती. त्याहीपेक्षा सामान्य जनांना किंवा वाचकांना कुतूहलाचे वाटणारे श्री. वसंतरावजींच्या जीवनातील अंग म्हणजे त्यांनी स्वतःच्या वंजारा समाजाच्या सुधारणेसाठी केलेले कार्य –हे कार्य अनेकार्थानी उद्बोधक आहे. दुर्दैवाने श्री. वसंतराव नाईक यांच्या षष्ठ्यब्दिपूर्तिनिमित्त प्रसिद्ध झालेल्या 'हिरवी क्षितिजे' या ग्रंथातही हा विषय उपेक्षिला गेला आहे. वंजारा समाजातील स्त्रीपुरुषांच्या आचार–विचारात आमूलाग्र क्रांती घडवून, त्यांच्या भटक्या जीवनात स्थैर्य आणि समृद्धी प्राप्त करून देऊन श्री. वसंतराव नाईकांनी फार मोठे सामाजिक परिवर्तनाचे कार्य केले आहे. त्यावर स्वतंत्र ग्रंथही होण्यासारखा आहे. "माझा समाज माझ्या आईपेक्षा मला अधिक प्रिय आहे" असे म्हणणाऱ्या वसंतरावजींच्या या समाजातील स्थित्यंतरांचा परामर्श अधिकारवाणीने कोणीतरी घेतला पाहिजे असे वाटते.

श्री पंढरीनाथ पाटील यांनी अत्यंत आस्थापूर्वक या ग्रंथलेखनाचा* प्रपंच केला आहे. त्यांचे सारे लेखन वस्तुस्थितिनिष्ठ सुबोध झाले असल्याने ग्रंथ वाचनीय झाला आहे. त्यांच्या लेखनाचा जाणवण्यासारखा विशेष असा की; ते घटनांची नोंद करतात, इतरांची मते देतात; परंतु त्यावर स्वतः भाष्य न करता वाचकांना स्वतःचे मत ठरवू देतात. आत्मीयता असूनही लेखनात राखलेली ही अलिप्तता अभिनंदनीय आहे. वसंतराव नाईक यांनी सुमारे एक तपपर्यंत महाराष्ट्रीय मुख्यमंत्रीपद भूषविले. या कालखंडात महाराष्ट्रातच नव्हे, तर साऱ्या भारतातही अनेक स्थित्यंतरे झाली व या घडामोडीत श्री. नाईकांना महत्त्वाचा वाटा उचलावा लागला. त्याचे ऐतिहासिक महत्त्व काळाच्या ओघात ठरेलच; परंतु या कालखंडाचा आढावा या ग्रंथरूपाने मराठी वाचकांस आज उपलब्ध झालेला आहे.

—डॉ. वसंत स. जोशी

---

* सामान्यांतील असामान्य : लेखक– श्री. पंढरीनाथ रावजी पाटील.
प्रकाशक : सौ. आशादेवी पंढरीनाथ पाटील, बिल्डिंग क्र. १०५, खो. क्र. ५, सरकारी वसाहत, बांद्रा ( पूर्व ) मुंबई–४०००५१.
मूल्य रुपये दहा.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ' निरोप घेता '

## ( डॉ. ना. भि. परुळेकर याचे आत्मचरित्र )

कै. नानासाहेबांच्या या आत्मचरित्राबद्दल–त्यातील आशयाबद्दल व त्यातून प्रतीत होणाऱ्या नानासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल पुष्कळच लिहिण्यासारखे आहे, व ग्रंथाचे निरनिराळ्या भागावर स्वतंत्र विस्तृत टिपणीवजा ते लिहिण्यासारखे आहे. परंतु ते न केले तरी काही सामान्य विचार मनात उत्कटतेने येतात.

पहिला असा की ज्याला वाङ्मयीन शैली म्हणता येईल तिचा वापर नानासाहेबांनी सकाळ मधील लिखाणात किंवा त्यांचे भाषणात जसा केला नाही तसाच तो या आत्मचरित्रातही साहजिकच केला नाही. तरीही या ग्रंथाला साहित्यिक मूल्यही आले आहे. याचे कारण त्यातील आशयाचा दर्जा व नेकी हे मुख्यत: असले तरी स्वत:चे विचार मुळात स्वच्छ असणे व ते तसेच व्यक्त करण्याचे सामर्थ्य असणे, हे दोन गुण या आत्मचरित्रातील निवेदनात नि:संशय-पणे प्रत्ययास येतात व म्हणून एका अर्थी भाषेची शैली हा गुणही त्यात आहे.

प्रस्तुत ग्रथात नानासाहेबांनी स्वत:बद्दल विधाने केली आहेत त्यात सकृतदर्शनी आपले यश व कर्तबगारीची हकीगत व स्वमतांविषयी आग्रह ही दिसली तरी निवेदनाची रोखठोक पद्धत व ताबडतोब त्या त्या घटनेवरून काढलेले वस्तुनिष्ठ, सामान्य सिद्धान्त यामुळे निवेदनास आत्मश्लाघेचा गौणपणा येतो असे वाचकांस वाटत नाही.

या ग्रंथाचे लेखनाबद्दल अगदी विसरता येणार नाही अशी गोष्ट त्यातील ' देवाची घंटा ' या विभागाचे वाचनाने मनावर ठसते व इतके असह्य शारीरिक हाल सहन करीत असता हा ग्रंथ लेखनिकाला सांगण्याइतकी ग्रंथकाराचे मनाची समता पाहून सादर विस्मय वाटतो. त्यात उल्लेख आहे ती ग्रंथकाराने देवाकडे केलेली प्रार्थना सफल होऊन अवश्य ते धैर्य व मनाची स्थिरता ही ग्रंथकारास मिळाली म्हणूनच हा ग्रंथ तयार होऊ शकला. सर थॉमस मोअर याचे अंतकाळची एक आठवण या निमित्ताने मनात येते Lord Chancellor म्हणून अनेक वर्षे न्यायदानाचे काम करणाऱ्या मोअरला राजाची अवकृपा झालेमुळे वधस्तंभाकडे नेण्यात येत होते. रस्त्यावर दुतर्फा नागरिक उभे होते त्यातल्या एकाला मोअरने सजा दिली होती. तो चवताळून त्याला म्हणाला कीं ' तू केलेल्या अन्यायाचे फळ तू भोगतो आहेस, हे ठीकच होय. ' मोअर मागे वळून शांतपणे त्याला म्हणाला की " आता या क्षणी– देवाचे राज्यात प्रवेश करीत असताना– मला खोटे बोलण्याचे प्रयोजन नाही; व तसे मी करू इच्छितही नाही. तुला माझे उत्तर हेच की आजही तुझा मुकदमा मजपुढे आला तर मी मागे दिला तोच निर्णय अजूनही देईन " नानासाहेबांच्या अगदी शेवटच्या दिवसात या आत्मवृत्तातील विविध घडामोडी व आपणास आलेले अनुभव त्यांनी अशाच परखडपणे व संपूर्ण आत्मविश्वासाने वाचकांपुढे मांडले

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहेत. गंभीर घटना, थोर माणसे याबद्दलचे लिखाणात योग्य तो भारदस्त-पणा आहे, त्या बरोबरच विनोदबुद्धी, वक्रोक्ती यांचाही जरूर तेथे आढळ येतो.

नानासाहेब वृत्तपत्रकार झाले ते देशसेवेचे स्वतःस योग्य असे क्षेत्र म्हणून व वृत्तपत्राद्वारे लोकशिक्षण व त्या बैठकीवरून प्रत्यक्ष सामाजिक कार्य त्यांनी सतत केले. अनेक उपक्रम योजिले. व पार पाडले. त्यात भाजीपाला समिती-पासून कीर्तनोत्तेजक संस्थेसारख्या संस्था आल्या. सार्वजनिक व स्थानिक संस्था-तील निवडणुका आल्या, दुष्काळ, पूर या प्रकारच्या नैसर्गिक आपत्तीं-विषयीचे कार्य आले. ग्रथलेख चित्रकला, फोटोग्राफी, देवस्थानांबद्दलची माहिती पुरवणे व त्यांस उत्तेजन देणे हेही आले. सकाळमधील संपादकीयात राजकीयेतर सामाजिक, सांस्कृतिक व औद्योगिक प्रश्नांची अनेक वेळां सोपपत्तिक चर्चा असे तरीही सकाळ सुरू झाला तेव्हाच्या स्वातंत्र्यपूर्व काळातच नव्हे तर आजही एका अर्थी राजकीय हक्क व कर्तव्ये ही नागरिकाच्या जीवनात मूलभूत महत्त्वाची असल्यामुळे त्याबद्दल योग्य ते मार्गदर्शन करणे हे आपले मुख्य कार्य होय, या धोरणाने नानासाहेब सकाळमध्ये सतत व ठामपणे मतप्रदर्शन करीत. त्यामुळे प्रसंगी लोकांची टीका व रोष ओढवला तरीही ते आपली मते स्पष्टपणे व जोरदारपणे मांडीत. संयुक्त महाराष्ट्राचे प्रश्नावर जवळ जवळ एकाकी असताही त्यांनी भाषिक राज्य स्थापण्याविषयी आपली पूर्ण नापसंती दाखविली. नेहरू व इंदिरा गांधी यांचे परराष्ट्रधोरण व उद्योग. धंद्याचे राष्ट्रीयीकरण यांतील त्यांचे मताप्रमाणे असलेल्या चुका ते सतत दाखवीत. स्वातंत्र्यपूर्व काळात व स्वातंत्र्यानंतरही सरकारच्या मर्जीत सकाळ कधीच नव्हता पण त्याच्या सारख्या वाढत्या खपामुळे व त्यातील माहितीवर आधारित व तर्कशुद्ध अशा लिखाणामुळे शासनास त्याची उपेक्षा करता आली नाही.

नानासाहेबांचा राजकीय दृष्टिकोन हा मूलतः गोखल्यांच्या Liberal विचारसरणीचा होय. परंतु गोखल्यांचे अनुयायी हे गतिमान राहिले नाहीत— नानासाहेबानी Liberalism च्या खऱ्या कक्षा व खोली ओळखली व टिळक-गांधी यांचा राष्ट्रीय बाणा हा एका अर्थी Liberalism च होय, असे मानले. गांधींच्या मुस्लीमांबद्दलच्या भूमिकेविषयी व एकंदर राजकारणात अवश्य व इष्ट असलेल्या तडजोडीच्या वृत्तीचे अभावाविषयी त्यांनी पुष्कळ वेळा टीका केली व गांधीनंतरचे भारतीय राजकारणात पं. नेहरू व इंदिराबाई यांनी असेच अव्यवहार्य व देशाचे दूरवर हिताचे दृष्टीने नानासाहेबांचे मते अनिष्ट असे धोरण ठेविले याबद्दल ते अनेकवेळा लिहीत. त्याबरोबरच विरोधी पक्षातील अंतर्गत कलह व अनेक प्रसंगी त्यानी दाखविलेली तत्त्वशून्य व देशहितविघातक वृत्ति यांवरही त्यांनी सतत टीका केली. मोठा खप असलेल्या वृत्तपत्रांचे लोक-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिक्षणातील स्थान न ओळखता त्याचेवर सरकारने घातलेल्या बंधनास त्यांनी सतत विरोध केला व प्रसंगी कोर्ट दरबार करूनही आपले हित संभाळले. टिळकांचा केसरी व गांधीचा यंग इंडिया किंवा हरिजन या श्रेणीचे सकाळ हे वृत्तपत्र नव्हे. कारण टिळक गांधी हे लोकोत्तर नेते होते व त्यांना काही विशेष संदेश जनतेपर्यंत पोचवायचा होता. पण सुशिक्षित देशप्रेमी व आपल्या पद्धतीने स्वार्थत्यागपूर्वक देशसेवा करणाऱ्या विचारी व्यक्तीचा दृष्टिकोन सकाळचे लिखाणात नेहमी दिसे. व नानासाहेबांच्या राजकीय–राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय घटनाविषयीच्या मते सर्वस्वी मान्य करता आली नाही तरी सुशिक्षित नागरीकाची एक प्रामाणिक प्रतिक्रिया म्हणून निःसंशय मूल्य आहे महाराष्ट्रीय वृत्तपत्र सृष्टीत नानासाहेबानी नव्याने मोठ्याप्रमाणावर केली ती गोष्ट ही की सामाजिक जीवन हे राजकीय जीवनापेक्षा पुष्कळ व्यापक आहे, व राजकारणाव्यतिरिक्त अनेक उपयुक्त क्षेत्रात कार्य झाले तरच राजकारणातील यशाचे चीज होते हे ओळखून संपादक म्हणून सकाळमधील लिखाणात व व्यक्ती म्हणून लहान मोठ्या समाजोपयोगी कार्यात त्यांनी निरलसपणे व समर्थपणे भाग घेतला.

या ग्रंथाचा थोडा तपशीलवार विचार केला तर नानासाहेबांचे व्यक्तित्वाचे निरनिराळे पैलू ध्यानात येतात. बालपण व विद्यार्थी दशा ज्या प्रकरणात वर्णीलेली आहेत. त्यावरून निसर्ग व आप्त यांचेविषयी जिव्हाळा असलेला एक ध्येयवादी तरुण कितीही अडचणी आल्या तरी आपली प्रगती व्हावी व आपणास समाजोपयोगी कर्तबगारी करता यावी याविषयी सतत प्रयत्नशील दिसतो. अमेरिकेतील त्यांचे विद्यापीठीय व वृत्तपत्रीय शिक्षणाचा जो वृत्तांत ग्रंथात आला आहे. त्यावरून किती जागरूकपणे त्यांनी पुढील जीवनाची पूर्वतयारी केली व अमेरिकेत मिळणाऱ्या संधीचा पुरेपूर उपयोग करुन घेतला हे लक्षात येते. सकाळच्या स्थापनेचे वेळी व पहिल्या काही वर्षात आलेल्या अडचणीवर निर्धाराने कशी मात केली, सकाळचे वाचकांना अद्यावत व विश्वसनीय माहिती मिळावी व त्याना देशापुढील प्रश्नावर स्वतः विचार करता यावा या हेतूने स्वतः अनेकवेळा परदेशी जाऊन फार चिकाटीने, धैर्याने व चाणाक्षपणे निरीक्षण केल्याच्या हकीगती त्या भागात आहेत. देशात सर्वत्र समंजस व कष्टाळू प्रतिनिधि पाठवून व महाराष्ट्रात व इतरत्र आलेल्या नैसर्गिक आपत्तीचे वेळी आपण होऊन बहुमोल मदत केल्याचे सविस्तर वृत्त, एक देशप्रेमी नागरिक म्हणून राजकर्त्यांच्या व विरोधी पक्षाच्या अनेक निर्णयांबद्दल दाखविलेली नापसंती व ज्याला फार उत्कट अर्थी समारोप म्हणता येईल असे शेवटल्या आजाराचाच निरोप घेताना आपणास पटलेल्या जीवनविषयक काही महत्वाचे विचार निवेदन या विभागांचा विशेष उल्लेख करण्यासारखा आहे.

प्र. रा. दामले


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिक्षणातील स्थान न ओळखता त्याचेवर सरकारने घातलेल्या बंधनास त्यांनी सतत विरोध केला व प्रसंगी कोर्ट दरबार करूनही आपले हित संभाळले. टिळकांचा केसरी व गांधीचा यंग इंडिया किंवा हरिजन या श्रेणीचे सकाळ हे वृत्तपत्र नव्हे. कारण टिळक गांधी हे लोकोत्तर नेते होते व त्यांना काही विशेष संदेश जनतेपर्यंत पोचवायचा होता. पण सुशिक्षित देशप्रेमी व आपल्या पद्धतीने स्वार्थत्यागपूर्वक देशसेवा करणाऱ्या विचारी व्यक्तीचा दृष्टिकोन सकाळचे लिखाणात नेहमी दिसे. व नानासाहेबांच्या राजकीय-राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय घटनाविषयीच्या मते सर्वस्वी मान्य करता आली नाही तरी सुशिक्षित नागरीकाची एक प्रामाणिक प्रतिक्रिया म्हणून निःसंशय मूल्य आहे महाराष्ट्रीय वृत्तपत्र सृष्टीत नानासाहेबानी नव्याने मोठ्याप्रमाणावर केली ती गोष्ट ही की सामाजिक जीवन हे राजकीय जीवनापेक्षा पुष्कळ व्यापक आहे, व राजकारणाव्यतिरिक्त अनेक उपयुक्त क्षेत्रात कार्य झाले तरच राजकारणातील यशाचे चीज होते हे ओळखून संपादक म्हणून सकाळमधील लिखाणात व व्यक्ती म्हणून लहान मोठ्या समाजोपयोगी कार्यात त्यांनी निरलसपणे व समर्थपणे भाग घेतला.

या ग्रंथाचा थोडा तपशीलवार विचार केला तर नानासाहेबांचे व्यक्तित्वाचे निरनिराळे पैलू ध्यानात येतात. बालपण व विद्यार्थी दशा ज्या प्रकरणात वर्णीलेली आहेत. त्यावरून निसर्ग व आप्त यांचेविषयी जिव्हाळा असलेला एक ध्येयवादी तरुण कितीही अडचणी आल्या तरी आपली प्रगती व्हावी व आपणास समाजोपयोगी कर्तबगारी करता यावी याविषयी सतत प्रयत्नशील दिसतो. अमेरिकेतील त्यांचे विद्यापीठीय व वृत्तपत्रीय शिक्षणाचा जो वृत्तांत ग्रंथात आला आहे. त्यावरून किती जागरूकपणे त्यांनी पुढील जीवनाची पूर्वतयारी केली व अमेरिकेत मिळणाऱ्या संधीचा पुरेपूर उपयोग करुन घेतला हे लक्षात येते. सकाळच्या स्थापनेचे वेळी व पहिल्या काही वर्षात आलेल्या अडचणीवर निर्धाराने कशी मात केली, सकाळचे वाचकांना अद्यावत व विश्वसनीय माहिती मिळावी व त्याना देशापुढील प्रश्नावर स्वतः विचार करता यावा या हेतूने स्वतः अनेकवेळा परदेशी जाऊन फार चिकाटीने, धैर्याने व चाणाक्षपणे निरीक्षण केल्याच्या हकीगती त्या भागात आहेत. देशात सर्वत्र समंजस व कष्टाळू प्रतिनिधि पाठवून व महाराष्ट्रात व इतरत्र आलेल्या नैसर्गिक आपत्तीचे वेळी आपण होऊन बहुमोल मदत केल्याचे सविस्तर वृत्त, एक देशप्रेमी नागरिक म्हणून राजकर्त्यांच्या व विरोधी पक्षाच्या अनेक निर्णयांबद्दल दाखविलेली नापसंती व ज्याला फार उत्कट अर्थी समारोप म्हणता येईल असे शेवटल्या आजाराचाच निरोप घेताना आपणास पटलेल्या जीवनविषयक काही महत्त्वाचे विचार निवेदन या विभागांचा विशेष उल्लेख करण्यासारखा आहे.

प्र. रा. दामले

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत : ज्ञानेश्वर विशेषांक

## नोव्हेंबर १९७५

### या अंकात—


शैवसूत्रे व अनुभवामृत
— तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

ज्ञानदेवांची जातिकुळावेगळी वंशावळी
— तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

ज्ञानेश्वरांची अभंगवाणी
— प्रा. वा. ल. कुलकर्णी

ज्ञानेश्वरांची ज्ञानोत्तरभक्ती
— प्रा. श्री. मा. कुलकर्णी

ज्ञानेश्वरीतील संसारदर्शन
— डॉ. प्र. न. जोशी

ज्ञानेश्वरीच्या एका प्राचीन हस्तलिखिताच्या निमित्ताने
— प्रा. पां. ना. कुलकर्णी,

ज्ञानेश्वरांची सामाजिक करुणा
— डॉ. ल. रा. नसिराबादकर

ज्ञानेश्वरांचे यथार्थदर्शन
— पं. बाळाचार्य खुपेरकर

ज्ञानेश्वरांच्या लेखनात ‘अरूपा’ला लाभलेले ‘रूप’
— डॉ. यू. म. पठाण

ज्ञानेश्वरांची जीवनदृष्टी
— श्री. भा. पं. बहिरट

श्रीज्ञानेश्वर व आधुनिक मन
— प्रा. रा. ग. जाधव

देशीकार लेणे
— डॉ. हे. वि. इनामदार

ज्ञानेश्वर-गोरक्षांचा नाथपंथ व शैवागम
— प्रा. मधुकर रामदास जोशी

त्र्यंबक मठिका
— डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे.


याशिवाय

डॉ. वि. भि. कोलते, डॉ. निर्मलकुमार फडकुले, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. वसंत स. जोशी, इ.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई